# मुंबईचा मार्गदर्शक
अर्थात्
# मुंबईचा मित्र.



लेखक,
जयराम रामचंद्र चौधरी, पिंपरूड.
( जोडाक्षर शिक्षणपाठ कर्ते. )

किंमत १ रुपया.

# मुंबईचा मार्गदर्शक

अर्थात

# मुंबईचा मित्र.

हें पुस्तक

जयराम रामचंद्र चौधरी, पिंपरूड.
( जोडाक्षर शिक्षणपाठ कर्ते )

यांनीं केलें.

आवृत्ति पहिली ] [ प्रति २०००



ता. १ जानेवारी सन १९२५.

किंमत १ रुपया.

# वाचकांस नम्र विनंति.

सदर्हु पुस्तकांतील जाहिरातीवरून कोणताही माल मागविणें झाल्यास, पत्र लिहितांना त्यांत " मुंबईचा मार्गदर्शक " या पुस्तकांतील आपल्या जाहिरातीवरून मागणी करविण्यांत येत आहे; असें वाचकांनीं जरूर लिहून कळविण्याची तसदी घ्यावी अशी त्यांना नम्र विनंति करण्यांत येत आहे.

*

# अर्पण

ज्यांच्या आशिर्वादानें व कृपाप्रसादानें हें पुस्तक लिहिण्याची
मला सदिच्छा होऊन, माझी उत्कट महत्वाकांक्षा पूर्ण
झाली; त्या मला वंदनीय वाटणाऱ्या माझ्या
तीर्थरूप बाबासाहेब यांची जाणीव माझ्या
अंतःकरणांत असल्याचें स्मृति चिन्ह
म्हणून ही अल्पशी कृति मी अनन्य
भावानें त्यांचे चरणीं
अर्पण करीत
आहें.

आपला नम्र बालक
जयराम.



# प्रस्तावना।

आजकाल विद्या, व्यापार व तदंगभूत संपत्ति इत्यादि गोष्टींत मुंबई शहराची बरोबरी करणारें शहर सबंध हिंदुस्थानांतच नव्हे तर ब्रिटिश राज्यांतील लंडन शहर शिवाय करून, मुंबईसारखें सर्वतोपरी व प्रेक्षणीय असें कोणतेंही शहर नसल्यामुळें, येथें नित्यशः अति लांबलांबचे व देशपरदेशचे हजारों उतारू लोक केवळ हें शहर पहाण्यास्तव मुद्दाम येत असतात. तसेंच हजारों व्यापारी निरनिराळ्या जातीचा नाना प्रकारचा माल खरेदी करावयासाठीं सदोदित येत असतात. परंतु मुंबईस येणाऱ्या उतारू व व्यापारी लोकांमध्यें मुंबईची विशेषशी माहिती असणारे फारच थोडे लोक आढळून येतात. व्यापारी लोकांचे जरी नित्यशः येणें जाणें असतें तरी त्यांना आपल्या धंद्याविषयीं जेवढी विशेष माहिती असते तेवढी इतर बाजूची मुळींच नसते. नवीन उतारू लोक तर गाडींतून किंवा बोटींतून उतरल्यावर रस्त्यावर चालत असलेली भयंकर रहदारी व गगनचुंबित इमारती वगैरे पाहून अगदींच गांगरून जातात; व त्यांना कोठें जावें ? कोठें उतरावें ? काय काय पहावें ? ह्याविषयीं मोठाच विचार होऊन कांहींएक सुचेनासें होतें. ह्याविषयीं गेल्या बारा वर्षांत मी येथें

राहात असतांना मुंबई पहाण्यास येणाऱ्या माझ्या देशबांधवांवरून मला बराचसा अनुभव आला आहे. व त्यावरूनच ही अडचण कांहीं अंशीं तरी दूर करून साधल्यास अल्पशी समाज सेवाही करावी ह्या सदिच्छेनें प्रस्तुत पुस्तक लिहिण्याचें धाडस करून, ह्यांत यथामति मुंबई पहाण्यास येणाऱ्या सर्व उतारूंस उपयुक्त अशी बहुतेक माहिती मिळवून ती शक्य तेवढी देण्याचा कसून प्रयत्न केला आहे. शेवटीं शेवटीं व्यापारी लोकां-साठीं व्यापारविषयक थोडी फार माहिती दिली आहे.

प्रस्तुत पुस्तक लिहितांना 'मुंबईचा वृत्तांत' वगैरे ज्या ज्या पुस्तकांचा उपयोग झाला त्या त्या पुस्तककर्त्यांचा मी अत्यंत ऋणी आहें; तसेंच छाप-खान्याचे मॅनेजर यांनींही हें पुस्तक काळजीपूर्वक तपासण्याची व शक्य तितकें लवकर छापून देण्याची मेहनत घेतली ह्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे. तसेंच मी एखादा पदवीधर किंवा मोठासा विद्वान गृहस्थ नसल्यामुळें सदरहू पुस्तकांत बऱ्याचशा चुका रहाण्याचा संभव आहे, तरी वाचकवर्गाच्या नजरेस आल्यास त्यांनीं मेहरबानी करून सदय अंतःकरणानें कळविण्याची कृपा करावी अशी नम्र विनंति आहे. तसेंच या पुस्तकाचा वाचकवर्गास उपयोग झाल्यास मला अत्यंत समाधान होऊन माझ्या श्रमाचें चीज झालें असें मी समजेन.

तारीख १।१।२५ पुस्तककर्ता.





# विषयानुक्रमणिका.

| विषय. | पृष्ठ. |
| --- | --- |

# मुंबईचा मार्गदर्शक
## अर्थात्
# मुंबईचा मित्र.



## मुंबई बेट

मुंबईच्या पूर्व, दक्षिण व पश्चिम ह्या तिन्ही बाजूंस अरबीसमुद्र असून, उत्तरेस ( चौथे बाजूस ) माहिमची खाडी आहे व पलीकडे साष्टी तालुका आहे. ह्यामुळें मुंबईस कित्येक मनुष्यें जलमार्गानें व कित्येक रेल्वे मार्गानें येत असतात. ह्या दोन्ही मार्गांची खालीं थोडक्यांत माहिती दिली आहे.

### रेल्वेविषयीं साधारण माहिती.

**दि ग्रेट इंडियन पेनिनशुला रेल्वे** ( जी. आय. पी. रेल्वे ):— मुंबईस जी. आय. पी. रेल्वे व बी. बी. सी. आय. रेल्वे ह्या दोन्ही कंपन्यांचे दोन फांटे आलेले आहेत. त्यांपैकीं जी. आय. पी. रेल्वेचा फांटा व्हिक्टोरिया टर्मिनस ( बोरीबंदर ) ह्या स्टेशनापासून निघून मशीद, माजगांव, भायखळा, चिंचपोकली, करीरोड, परळ, दादर, माटुंगा व शींव या मुंबईतील स्टेशनांवरून पुढें ठाणें जिल्ह्यांतील कल्याण स्टेशनापर्यंत गेल्यावर हिचे येथून दोन फांटे झाले आहेत. **एक फांटा**:— थळघांटांतून ( बोगदे पाडून ) इगतपुरी, नाशीक, भुसावळ, जबलपूर वगैरे स्टेशनांहून थेट दिल्लीस गेला आहे. **दुसरा फांटा**.—बोरघांटांतून ( बोगदे पाडून ) पुणें, सोलापूर, वगैरे स्टेशनांहून रायचूरपर्यंत गेला आहे.

**थळघांट व बोरघांट ह्यांतील बोगदेः**—नाशिककडून व पुण्याकडून मुंबईस येणाऱ्या जी. आय. पी. रेल्वेच्या आगगाड्यांचा मार्ग डोंगरांतून असल्यामुळें, तो मोठा बिकट व भयंकर कठीण आहे. ठिकठिकाणीं चढता व उतरता भाग विशेष असल्यामुळें, बऱ्याच ठिकाणीं डोंगरांतील टेंकड्यांना आरपार कोरून मार्ग काढावा लागला आहे. ह्या कोरलेल्या भागास 'बोगदा' असें म्हणतात. ह्या बोगद्यांत आगगाडी शिरतांच दिवसादेखील अगदीं काळोख पडत असतो. सबब बोगदे लागण्यापूर्वी मोठ्या स्टेशनावर पॅसेंजर व मेल गाडींतील दिवे लावण्यांत येत असतात. हे बोगदे ज्यांनी पूर्वी कधींही पाहिलेले नसतात त्यांना हे बोगदे पाहून फारच नवल वाटतें.

**मुंबईस येणाऱ्या उतारूंचीं तिकीटें:**—नाशिककडून व पुण्याकडून मुंबईस मेलनें येणाऱ्या सर्व उतारूंचीं तिकिटें कल्याण स्टेशनावर गाडी येतांच तपासलीं जाऊन तीं तेथेंच घेण्यांत येतात. तसेंच पॅसेंजरनें येणाऱ्या सर्व उतारूंचीं तिकीटें मशींद स्टेशनावर तपासलीं जाऊन तींही तेथेंच घेण्यांत येतात. ह्यामुळें बोरीबंदर स्टेशनावर कोणत्याही गाडींतील उतारूंचीं तिकीटें तपासण्याचें कारण नसल्यामुळें उतारूलोक गाडींतून उतरतांच इच्छित स्थळाकडे जाऊं लागतात.

## जी. आय. पी. रेलवेचीं शहरांतील ऑफिसें.

**( १ ) ताजमहाल हॉटेल तिकीट ऑफिसः**—हें ऑफिस १०॥ ते ६ वाजेपर्यंत उघडें असतें. येथें पहिल्या व दुसऱ्या वर्गाचीं तिकीटें व फक्त त्यांच्या नोकर लोकांकरितां तिसऱ्या वर्गाचीं तिकीटें मिळतात. येथें लगेज घेतलें जातें मात्र पार्सल घेतलें जात नाहीं.

**( २ ) पायधुणी तिकीट आणि पार्सल ऑफिस**—येथें सर्व उतारू लोकांस तिकीटें मिळतात. येथें लगेज घेतलें जात नाहीं, पार्सल घेतलें जातें.

मात्र प्रत्येक पार्सलास रेल्वे हांशिलाशिवाय एक आणा जास्त घेण्यांत येतो. येथें एक मणापर्यंत पार्सल घेतलें जातें. हें ऑफिस सकाळीं १०॥ वाजेपासून संध्याकाळीं ६ वाजेपर्यंत उघडें असतें. या ठिकाणीं घेतलेलें तिकीट त्या दिवसापासून दुसऱ्या दिवसाच्या शेवटच्या गाडीपर्यंत चालतें.

**व्यापारी माल चढण्या उतरण्याचें ठिकाण**—वाडीबंदर हें होय. **रेल्वे संबंधीं माहिती**–व्हिक्टोरिया टर्मिनस ( बोरीबंदर ) स्टेशन। वरील प्लॅटफार्म नं० १ वर एक ऑफिस आहे. ह्या ठिकाणीं उतारू लोकांस रेल्वेसंबंधीं हवी ती माहिती मिळूं शकेल.

**प्रवाससंबंधीं माहिती**—तिसऱ्या वर्गानें प्रवास करणाऱ्या लोकांना मदत करण्याकरितां रेल्वे कंपनीनें बोरीबंदर स्टेशनावर **पॅसेंजर सुपरिंटेंडेंट** यांची नेमणूक केलेली आहे. कोणास मदत किंवा प्रवासासंबंधानें कोणतीही माहिती विचारावयाची असल्यास त्यानें सदर्हु पॅसेंजर सुपरिंटेंडंट यांस विचारावें.

## बी. बी. सी. आय् रेल्वेविषयीं साधारण माहिती.

**दी बॉम्बे बडोदा अँड सेंट्रल इंडिया रेल्वे** ( बी. बी. सी. आय् रेल्वे ):–ह्या रेल्वेचा फांटा कुलाबा टर्मिनस स्टेशनापासून निघून चर्चगेट, मरीन लाइन्स, चर्नीरोड, ग्रँटरोड, महालक्ष्मी, लोअर परळ, एलिफन्स्टन रोड, दादर, माटुंगा व माहीम ह्या स्टेशनांवरून ठाणें जिल्ह्यांतून पुढें सुरत, भडोच, बडोदें, अहमदाबाद वगैरे स्टेशनांवरून खारा घोड्यापर्यंत गेला आहे.

ह्या रेल्वे कंपनीचें माहीम स्टेशन टाकतांच माहीमचे खाडीचा पूल तसेंच पुनः भाईंदर स्टेशन टाकतांच वसईचे खाडीचा भव्य पूल व पश्चिम बाजूस असलेला वसईचा प्रसिद्ध किल्ला यांचा देखावा फारच नयन मनोहर दिसतो. भाईंदर स्टेशनाचे पश्चिमेस व उत्तरेस वसई स्टेशनापर्यंत मिठाच्या असंख्यात राशीच्या राशी दृष्टीस पडतात. मिठाच्या पोत्यांची

ने आण करण्याकरितां वसईचे खाडींतून मोठमोठीं गलबतें सतत चालू असतात. हीं गलबतें लावण्याकरितां येथें एक धक्का बांधलेला आहे. ह्या धक्क्यावरून मिठाचीं भरलेलीं हजारों पोतीं आगगाडींतून अति लांब लांबच्या प्रदेशास रवाना होत असतात. ह्या रेल्वे कंपनीनें भडोच गांवाजवळ नर्मदा नदीवर एक मोठा भव्य पूल बांधलेला असून तो प्रेक्षणीय आहे.

## बी. बी. सी. आय रेल्वेचीं शहरांतील ऑफिसें.

**कालबादेवी रोड तिकीट अँड पार्सल ऑफिस**—हें ऑफिस सकाळीं १०॥ ते ६ वाजेपर्यंत उघडें असतें. येथें सर्व उतारू लोकांस तिकीटें मिळत असतात. येथें घेतलेलें तिकीट घेतल्या दिवसापासून दुसरे दिवशीं शेवटचे गाडीपर्यंत चालतें. येथें १॥ मणापर्यंत पार्सल घेतलें जातें. लगेच मात्र घेतलें जात नाहीं.

**क्राफर्ड मार्केट पार्सल ऑफिस**—हें ऑफिस सिताराम बिल्डिंगमध्यें पोस्ट ऑफिसानजीक असून, तें १०॥ ने ६ वाजेपर्यंत उघडें असतें. येथें फक्त एक मणापर्यंत असलेलीं पार्सलें घेतात.

**ताजमहाल हॉटेल तिकीट ऑफिस**:—हें ऑफिस अॅपोलो बंदरानजीक असून, तें १०॥ ते ६ वाजेपर्यंत उघडें असतें. येथें देखील पहिल्या व दुसऱ्या वर्गाचीं तिकीटें व फक्त त्यांच्या नौकर लोकांकरितां तिसऱ्या वर्गाचीं तिकीटें मिळतात. येथें लगेज घेतलें जातें मात्र पार्सल घेतलें जात नाहीं.

## लोकल ट्रेन्स ( स्थानिक आगगाड्या )

मुंबईंतलि लोकांच्या सोईसाठीं ज्या आगगाड्या आहेत, त्यांना 'लोकल ट्रेन्स, (स्थानिक आगगाड्या) हें नांव आहे. जी. आय. पी. रेल्वे-व बी. बी. सी. आय्. रेल्वे या दोन्ही रेल्वे कंपन्यांच्या येथें लोकल ट्रेन्स आहेत. जी. आय. पी. रेल्वेनें आपल्या लोकल ट्रेन्स मुंबई, टाणें, कुर्ला व

कल्याण यांच्या दरम्यान ठेविल्या आहेत. तसेंच बी. बी. सी. आय. रेल्वेनें आपल्या लोकल ट्रेन्स मुंबई, अंधेरी, बोरिवली व विरार वांद्रा यांच्या दरम्यान ठेविल्या आहेत. ह्या लोकल ट्रेन्स मुंबईस प्रत्येक स्टेशनावर सुमारें १०।१५ मिनिटांनीं सारख्या येत जात असतात. मुंबईतील आगगाड्यांचीं स्टेशनें सुमारें पाऊण–एक मैलाच्या अंतराअंतरावर बांधलेलीं आहेत. एका स्टेशनाहून दुसऱ्या स्टेशनापर्यंतच जावयाचें आसल्यास दर तिकी-टीस अर्धा आणा पडत असतो.

ह्या लोकल गाड्यांतून सतत जाणारांना थोडक्या पैशांत जातां यावें म्हणून त्यांच्यासाठीं महिन्याचे, तीन महिन्यांचे व सहा महिन्यांचे स्वस्त दराचे पास मिळत असतात. त्यामुळें ८।१० मैलांवर स्वस्त भाड्यांच्या घरांत व निर्मळ हवेंत राहतां येऊन मुंबईस रोज दीड–दोन आण्याच्या पैशांत त्यांना जातां येतां येतें. मुंबईस लांबलांबच्या ऑफिसांत, कारखान्यांत, गिरण्यांत काम करणाऱ्या लोकांची व शाळेंत येणाऱ्या विद्यार्थ्यांची या लोकल ट्रेनपासून फारच फार उत्तम सोय झाली आहे.

जी. आय. पी. रेल्वेचीं परळ व दादर व बी. बी. सी. आय. रेल्वेचीं एल्फिन्स्टन रोड व दादर हीं स्टेशनें जवळ जवळ आलेलीं आहेत. परंतु बहुतेक गाड्या दादर स्टेशनवर थांबत असल्यामुळें, एका गाडींतून दुसऱ्या गाडींत जाणें झाल्यास दादर स्टेशन अगदीं सोईचें पडतें.

या दोन्ही रेल्वे कंपन्यांच्या आगगाड्या सारख्याच रुंदीच्या असल्या-मुळें, दोघांच्याही गाड्या परस्परांच्या मार्गानें जात येत असतात. परळ व दादर या स्टेशनांच्या दरम्यान दोघांचेही मार्ग अनायासें एकमेकांच्या जवळ आले असल्यामुळें, तेथेंच गाड्या बदलण्याचे सांधे जोड-लेले आहेत.

**सूचना**—कोणतीही लोकल गाडी कोणत्याही दिवशीं कांहींएक कारण दाखविल्याशिवाय किंवा पूर्वी जाहीर केल्याशिवाय बंद कर-ण्याचा हक्क येथील कंपन्यांनीं आपले स्वाधीन ठेविला आहे.

# रेल्वे लगेज करण्याचे व पार्सलें पाठविण्याचे दर.

| मैल अंतर. | बंगाली १० शेरांपर्यंत | | बंगाली २० शेरांपर्यंत | | बंगाली ३० शेरांपर्यंत. | | बंगाली ४० शेरांपर्यंत. | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | रु. | आ. | रु. | आ. | रु. | आ. | रु. | आ. |
| १–२५ | ० | ६ | ० | ६ | ० | ६ | ० | ६ |
| २६–५० | ० | ६ | ० | ६ | ० | १२ | ० | १२ |
| ५१–७५ | ० | ६ | ० | १२ | १ | १ | १ | १ |
| ७६–१०० | ० | ६ | ० | १२ | १ | १ | १ | ७ |
| १०१–१२५ | ० | १२ | १ | १ | १ | ७ | १ | १३ |
| १२६–१५० | ० | १२ | १ | १ | १ | ७ | २ | २ |
| १५१–१७५ | ० | १२ | १ | ७ | १ | १३ | २ | ८ |
| १९६–३०० | ० | १२ | १ | ७ | २ | २ | २ | १३ |
| ३०१–३२५ | १ | १ | १ | १३ | २ | ८ | ३ | ३ |
| ३२६–३५० | १ | १ | १ | १३ | २ | १३ | ३ | ९ |
| ३५१–३७५ | १ | १ | २ | २ | ३ | ३ | ३ | १४ |
| ३७६–४५० | १ | १ | २ | २ | ३ | ३ | ४ | ४ |
| ४५१–४७५ | १ | ७ | २ | ८ | ३ | ९ | ४ | १० |
| ४७६–५०० | १ | ७ | २ | ८ | ३ | १४ | ४ | १५ |
| ५०१–५२५ | १ | ७ | २ | १२ | ४ | ४ | ५ | ५ |
| ५२५–६०० | १ | ७ | २ | १२ | ४ | ९ | ५ | ११ |

**टीप—**सदरहू कोष्टकावरून प्रत्येक मणास व त्याच्या भागास वरीलप्रमाणें आकार काढावा. भाजीपाला, फळफळावळ वगैरे नासक्या मालास व वर्तमानपत्रें यांस निम्मे आकार पडतो. एका घन फुटाचें वजन ५ शेर धरतात. ५ शेर वजनापर्यंत २५० मैलांस ६ आणे प्रमाणें आकार पडतो.

## जी. आय्. पी. आणि बी. बी. सी. आय्. रेल्वे यांचे प्रत्येक मैलांचे तिकिटांचे दर.

| | ३०० मैलपर्यंत. | ३०० मैलापुढें. |
|---|---|---|
| पहिला वर्ग | दर मैलास २४ पै. | दर मैलास १८ पै. |
| दुसरा वर्ग | ,, ,, १२ पै. | ,, ,, ९ पै. |
| इंटर वर्ग | ,, ,, ७॥ पै. | ,, ,, ६ पै. |
| तिसरा व मेल, एक्स्प्रेस | ५ पै. | ,, ,, ४॥ पै. |
| पॅसेंजर तिसरा वर्ग ,, | ४ पै. | ,, ,, ३॥ पै. |

**लगेजसंबंधीं माहिती:**—प्रत्येक प्रवाशास आपलेबरोबर खालीं दर्शविल्याप्रमाणें सामान ( लगेज ) फुकट नेतां येतें.

पहिला वर्ग ६० शेर. दुसरा वर्ग ३०. तिसरा वर्ग मेलगाडी २० शेर. तिसरा वर्ग पॅसेंजर गाडी १५ शेर. ह्याप्रमाणें बंगाली वजन नेण्याचें उतारूंस माफ आहे. ह्यापेक्षां जास्त वजन असल्यास गाडी सुटण्यापूर्वी अर्धा तास अगोदर वजन करून लगेजची पावती घ्यावी. मात्र अंथरूण व फराळाचे पदार्थ यांचें वजन करूं नये.

## आगबोटी विषयीं साधारण माहिती.

दी बाम्बे स्टीम नॅव्हिगेशन कंपनी—या कंपनीच्या बोटी पावसाळा संपतांच पुढें ८ महिने सतत चालू असतात. एकादेवर्षी व बहुतकरून मे महिन्याचे सुमारास ह्या कंपनीचे दर वाढतात. ह्या कंपनीच्या बोटी किनाऱ्यावरील बहुतेक बंदरें करीत थेट गोव्यापर्यंत जातात. या कंपनीच्या बोटींचीं तिकीटें शहरांत कांदेवाडी व परेल येथें मिळतात. आंलेक्झांड्रा डॉकवर फक्त बोट सुटण्यापूर्वी एक तास अगोदर मिळूं शकतात. आलेक्झांड्रा डॉकच्या बाहेरील धक्क्यावरून उलवा, धरमतर, हर्णै, दाभोळ, विजयदुर्ग, व गोवा ह्या लाईनींच्या बोटी सुटतात.

## बोटी सुटण्याच्या वेळा.

उलवा लाईनची बोट दुपारीं २ वाजतां; धरमतर लाईनची बोट सकाळीं ७॥ वाजतां; दाभोळ, लाईनची बोट सकाळीं ८॥ वाजतां; हर्णै लाईनची बोट सकाळीं १० वाजतां व गोवा लाईनची बोट सकाळीं १० वाजतां ह्याप्रमाणें बोटी रोज मुंबईहून सुटतील. ( टाईम स्टँडर्ड समजावा. )

### दी बाम्बे स्टीम नॅव्हिगेशन कंपनीच्या बोटींचे दर.

| | दुसरा वर्ग. | तिसरा वर्ग. |
|---|---|---|
| बंदर. | रु. आ. | रु. आ. |
| आलिबाग | १—८ | १—० |
| रेवदंडा | १—८ | १—० |
| जंजिरा | २—१ | १—५ |
| श्रीवर्धन | २—७ | १—९ |
| हरेश्वर | २-१३ | १-१३ |
| माप्रळ | २-१५ | १-१५ |
| दासगांव | ३—१ | २—१ |
| हर्णै | ३—६ | २—२ |
| बंदर. | दुसरा वर्ग. | तिसरा वर्ग. |
| दाभोळ | ३-१२ | २—६ |
| करूळ | ३-१४ | २—८ |
| चिवेली | ३-१४ | २—८ |
| करबोने | ४—० | २-१० |
| गोवळकोट | ४—२ | २-१२ |
| बोऱ्या | ३-१४ | २—८ |

| | | |
|---|---|---|
| जयगड | ३—१४ | २—८ |
| जांभारी | ४—० | २—१० |
| मोभार | ४—२ | २—१२ |
| करजुवें अथवा राई | ४—२ | २—१२ |
| फुणगुस | ४—४ | २—१४ |
| कुरदंडा | ४—५ | २—१५ |
| संगमेश्वर | ४—६ | ३—० |
| तिवरी | ४—२ | २—१० |
| रत्नागिरी | ४—१२ | ३—० |
| पुरणगड | ५—२ | ३—४ |
| जयतापूर | ५—४ | ३—६ |
| राजापूर | ५—६ | ३—८ |
| विजयदुर्ग | ५—६ | ३—८ |
| देवगड | ५—१२ | ३—१२ |
| मालवण | ६—२ | ४—४ |
| वेंगुर्ला | ६—६ | ४—८ |
| पणजी गोवा | ६—८ | ५—० |

## धरमतर लाईन.

| | पहिला वर्ग. | दुसरा वर्ग. | तिसरा वर्ग. |
|---|---|---|---|
| मांडवा | १—२ | ०—९ | ०—६ |
| करंजा | १—२ | ०—९ | ०—६ |
| रेवस | १—२ | ०—९ | ०—६ |
| धरमतर | १—१० | ०—१४ | ०—१० |
| नागोठणें | १—१४ | १—२ | ०—१४ |

## उलवा लाईन.

| | पहिला वर्ग. | दुसरा वर्ग. | तिसरा वर्ग. |
|---|---|---|---|
| | रु. आ. | रु. आ. | रु. आ. |
| उरण | ०-१२ | ०—८ | ०—४ |
| एलिफंटा | १—८ | ०-११ | ०—६ |
| नाहावा | १—८ | ०-११ | ०—६ |
| उलवा | १—८ | ०-१२ | ०—८ |
| एलिफंटा रिटर्न | २—८ | १—४ | ०-१० |

**टीप**—आगबोटीचे दर व सुटण्याचे टाईम कायमचेच असतात असें मात्र समजूं नये, कारण ते वाटेल तेव्हां बदलतात.

आगबोटी सुटण्याचीं ठिकाणें—( १ ) कोंकणपट्टी, गोवें, पनवेल, धरमतर वगैरे बाजूस जाणाऱ्या बोटी अलेक्झांड्रा डॉकच्या बाहेरील धक्कयावरून सुटतात व तेथेंच परत येणाऱ्याही लागतात.

( २ ) कच्छ, मांडवी, कराची, कारवार ह्या बाजूस जाणाऱ्या बोटी प्रिन्सेस डॉकमधून सुटतात व त्याच ठिकाणीं येणाऱ्या बोटी लागतात.

( ३ ) परदेशीं जाणाऱ्या मोठ्या आगबोटी प्रिन्सेस डॉक, बेलार्ड पिअर व ॲपोलो बंदर येथून सुटतात व तेथेंच परत येणाऱ्या बोटी लागतात.

**पार्सलचे दर**—बर्फ, मांस अथवा मत्स्य, लोणी, मेवामिठाई, वाईन, स्पिरिट, ( दारू ) इरेटेड वाटर ( सोडावाटर वगैरे ), फळफळावळ ( फणस व आंबे खेरीज करून ) भाजीपाला, नागवेलीचीं पानें, अंगावरील वापरावयाचे कपडे इत्यादि जिन्नसांस प्रत्येक दहा शेरास व त्याचे भागास ०४ आणे. स्वतंत्र पार्सलास एक रुपयापेक्षां अधिक पडणार नाहीं.

**लगेजचे दर**—माफी वजनापेक्षां जेवढें वजन जास्त भरेल त्यास बंगाली मणास १ रुपयाप्रमाणें भाडें घेतलें जातें. सदहु वजन उतारूंनीं बोट सुटण्यापूर्वी अर्धा तास अगोदर करवून पावती घ्यावी. मालकाशिवायच्या लगेजचा दर पार्सलाचे दराप्रमाणें द्यावा लागतो.

**फुकट ओझें**—उतारूबरोबर स्वयंपाकाचीं व जेवणाचीं भांडीं, बिछाने व किरकोळ सामान ह्यांचें एकत्र वजन करून त्यांतून खालीं लिहिल्याप्रमाणें वजन माफ केलें जातें. पहिले वर्गाचे उतारूंस बं० २ मण, दुसरे वर्गाचे उतारूंस बं० १ मण व तिसरे वर्गाचे उतारूंस बं० २० शेर वजन माफ आहे.

## मुंबई पाहण्यास जाणाऱ्या लोकांनीं लक्षांत ठेवण्यासारख्या कांहीं ठळक गोष्टी.

( १ ) आपणास कोठें उतरावयाचें ह्याविषयीं पूर्वीच ठरवून ठेवावें. ज्याकडे उतरावयाचें असेल त्याचेकडे जागेची सोय होईल किंवा नाहीं, ह्याविषयीं अगोदरच पत्रानें चौकशी करून घ्यावी, कारण मुंबईस घरभाडें फार महाग असल्यामुळें एकाद्याकडे उतरण्यास पुरेशी जागा असेलच असें समजून चालूं नये. सबब पत्रानें चौकशी करून घ्यावी.

( २ ) ज्यांना रोज माणशीं २॥-३ किंवा याहीपेक्षां अधिक रुपये देण्याचें सामर्थ्य असेल त्यांनीं सरदारगृह, न्यू-सरदार आश्रम, माधवाश्रम, ताजमहाल हॉटेल वगैरे ठिकाणीं पूर्वीच लिहून तेथें उतरण्याची व्यवस्था करून घ्यावी. कारण वेळेवर आपण तेथें गेलों व कदाचित् तेथें जागा खालीं नसली तर पुनः आपणास दुसरीकडे जावयाची पाळी येणार व विनाकारण फिरण्यांत वेळ जाऊन शिवाय तांगाभाडें किंवा ट्रामभाडें दुप्पट पडणार, ह्यास्तव अगोदरच खुलासा करून घ्यावा.

( ३ ) ज्यांना विशेष खर्च करण्याचें सामर्थ्य नसेल त्यांनीं हिराबाग, माधवबाग, सुखानंदजी धर्मशाळा वगैरे ठिकाणीं जाऊन तेथील मॅनेजरास भेटून उतरण्याची व्यवस्था करून घ्यावी अशा ठिकाणीं फुकट अगर भाड्यानेंही खोल्या रहावयास मिळत असतात.

( ४ ) पुणें किंवा नाशिककडून येणाऱ्या उतारूंना आरामशीर जावयाचें असल्यास, त्यांनीं बोरीबंदर स्टेशनावर उतरून व्हिक्टोरियांतून ( चारचाकी घोड्याचे गाडींतून ) इच्छित स्थळीं जावें.

( ५ ) ट्रामगाडीनें जावयाचें असल्यास भायखळा स्टेशनावर उतरून ट्रामनें जावें. बोरीबंदर स्टेशनावर ट्राम भरून येत असल्यामुळें, तेथें ट्राममध्यें जागा मिळण्यास अडचण पडते. अशी अडचण भायखळा स्टेशनावर पडत नाहीं.

( ६ ) प्रत्येक मनुष्यानें ट्रामगाडींतून उतरतेवेळीं ट्राम ज्या बाजूस जात असेल त्या बाजूसच तोंड करून उतरावें. ट्राम चालत असतांना उलट बाजूस तोंड करून उतरल्यास ट्रामच्या वेगामुळें मनुष्याचा झोंक मागें जाऊन, मनुष्य जमिनीवर आपटण्याची भांति असते. गैर माहितगार मनुष्याकडून अशा चुका झाल्याचीं व त्यामुळें अपघात झाल्याचीं अनेक उदाहरणें घडलीं आहेत. सबब ट्रामगाडींतून उतरतेवेळीं सावध असावें.

( ७ ) ट्रंक वगैरे बोझा जवळ असतांही पायींच जावयाचें असल्यास एकादा ‘ हेलकरी ’ ( पाटीवाला ) करून, त्यास बरोबर घेऊन इच्छित स्थळीं जावें.

( ८ ) प्रत्येक इसमानें मुंबईस जातेवेळीं आपला पोषाख शक्य तितका स्वस्छ, नीटनेटका व उत्तम असा करून जावें. वेडेंवांकडें उपरणें, वेडावांकडा फेटा किंवा पागोटें पाहून हा मनुष्य परगांवाचा व अर्थात खेडेगांवाचा आहे असें समजून, मुंबईतील परजातीय लोक व दुकानदार कधीं कधीं थट्टामस्करी किंवा फसविण्याचा यत्न करितात.

( ९ ) मुंबईंत सावधगिरीशिवाय रस्त्यांतून चालणें म्हणजे मोठें धोक्याचें काम आहे; कारण रस्त्यांतून तांगे, खटारे, सायकली ट्रामगाड्या, मोटारगाड्या, वगैरे गाड्यांची अतिशय गर्दी उडालेली दृष्टीस पडते, त्यामुळें ह्यांच्या सपाट्यांत सांपडून मनुष्यास दुखापत होण्याचा विशेष संभव असतो. ह्यासाठीं कोणत्याही मोठ्या शहरांत 'गाडी डाव्या बाजूनें हांकावी' असा एक ठराविक नियम असतो. सबब प्रत्येक मनुष्यानें मुंबईंत फिरतांना नेहमीं जेथें रस्त्याचे बाजूस फुटपायरी काढलेली असेल तेथें फुटपायरीवरून चालावें व जेथें नसेल तेथें रस्त्याचे उजवे बाजूनें चालावें. उजवे बाजूनें जाण्यापासून मागून येणाऱ्या गाड्यांचा धक्का बसण्याची भीति नसते. मग फक्त समोरून येणाऱ्या गाड्यांचीच काय ती काळजी राहते.

( १० ) मुंबईस फसवेगिरीचे अनेक प्रकार आहेत. ह्यास्तव खालील कांहीं ठळक गोष्टी पूर्ण लक्षांत ठेविल्या म्हणजे मुंबईस जाणाऱ्या मनुष्यांवर पश्चात्तापाचा प्रसंग केव्हांही येणार नाहीं.

( १ ) **ली गोष्ट**—पायीं मार्गांतून केव्हांही चालत असतांना किंवा एकादे स्थळीं कोणतीही गंमत पहात असतांना खिशांतील पैसाअडका चांगला संभाळून ठेवावा व कोटाचीं बटनें नेहमीं लावलेलीं असावीं. चालतांना ह्याविषयीं नेहमीं खबरदारी घेत असावें.

( २ ) **री गोष्ट**—मुंबईस अपरिचित मनुष्यानें बोलाविल्यास त्याचे बरोबर कोठेंही जाऊं नये व त्याचे बरोबर कोणताही व्यवहार करूं नये.

( ३ ) **री गोष्ट**—'तुम्हास अमुक गंमत दाखवितों' असें म्हणून बोलावणारे पुष्कळ ठग लोक असतात त्यांचेकडे बिलकूल लक्ष देऊं नये.

( ४ ) **थी गोष्ट**—मुख्य मुख्य रस्त्यावर १५।२० औषधी जिनसा पुढें ठेवून बसणारे कांहीं भोंदू वैद्य येथें असतात त्यांच्याशीं कोणताही व्यवहार करूं नये.

( ५ ) **वी गोष्ट**—कांहीं ठग लोक असे असतात कीं, आपल्या-जवळ दिसण्यांत मौल्यवान व गुणांत नकली असा एकादा जिन्नस घेतात, व रस्त्यानें चालतां चालतां एकादा भोळसर मनुष्य दृष्टीस पड-तांच त्यास नकळत तो जिन्नस त्याचे पुढें मोठ्या शिताफीनें टाकतात. नंतर त्या वस्तुवर ह्या भोळसर व अजाणत्या मनुष्याची नजर पडतांच तो ती वस्तु तात्काळ उचलून घेतो. एवढें कृत्य होतांच ठग त्यास गांठतो व गोड गोड थापा मारून त्याचेकडून पैसे काढून घेतो व लाग-लींच तेथून निघून जातो. ह्यास्तव प्रत्येक मनुष्यानें चालतांना रस्त्यांत पडलेली कोणतीही वस्तु असल्यास ती घेऊं नये.

( ६ ) **वी गोष्ट**—रस्त्यांतून एकादा जिन्नस विकणारे मुसलमान व्यापारी, तसेंच लहानसहान मुसलमान दुकानदार यांचेकडे कोणतीही वस्तु विकत घेतांनां जपून घ्यावी. कारण हे प्रथम भलतीच किंमत सांगतात, व अखेर फसवितात. बरें आपण योग्य किंमतीस ती वस्तु मागितली तर ‘ अरे ज्या ज्या ( म्हणजे अरे जा जा ) मोठा घ्यायला आला ’ अशा प्रकारची हलकट भाषा वापरून मनुष्याचा अगदीं पाणउतारा करून टाकतात. सबब अशा लोकांकडून कोणतीही वस्तु विकत घेऊं नये.

( ७ ) **वी गोष्ट**—स्टोअर्स मोठीं किंवा प्रसिद्ध दुकानें यांवांचून, इतर दुकानांत कोणतीही वस्तु घ्यावयाची असल्यास, मुंबईच्या माहितगार मनुष्यास बरोबर घेऊन जावें.

(११) **राणीचा बाग व आल्बर्ट म्युझियम**—हा बाग व म्युझियम दर रविवारीं सकाळीं ८ ते संध्याकाळीं ५ वाजेपर्यंत व मंगळवार ते शनिवारपावेतों सकाळीं १० ते संध्याकाळीं ५ वाजेपर्यंत उघडा राहील. दर **सोमवारीं** मात्र म्युझियम बंद राहील. ( मुंबई टाईम ).

(१२) **प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियम**—हा म्युझियम आठवड्यांतील **सोमवार** व **बुधवार** खेरीजकरून इतर सर्व दिवशीं सर्व लोकांस फुकट पाहतां येईल.

**पाहण्याची वेळ**—हा म्युझियम १ आक्टोबरपासून ३१ जानेवारी-पर्यंत सकाळीं १० ते सायंकाळीं ५॥ वाजेपर्यंत व १ फेब्रुवारीपासून ३० सप्टेंबरपर्यंत सकाळीं १० ते ६ वाजेपर्यंत उघडा ठेवण्यांत येईल. ( स्टँडर्ड टाईम. )

**दर बुधवारीं** हा म्युझियम पाहण्यास दर मनुष्यास ०४ आणे फी पडेल.

**दर सोमवारीं** म्युझियम बंद राहील.

## सार्वजनिक धर्मशाळा.

मुंबईच्या मानानें पाहूं गेलें असतां मुंबईसारख्या अफाट शहरांत बऱ्याचशा धर्मशाळा श्रीमंत लोकांनीं बांधून ठेवावयास पाहिजे होत्या; परंतु त्या मानानें पाहूं गेलें तर मुंबईस धर्मशाळाच नाहींत असें म्हटलें तरी चालेल. कारण उतारूंस मुंबईस आगगाडींतून अगर बोटींतून जमिनीवर पाय ठेवतांच ह्या बकाली शहरांत आतां आपण कोठें उतरावें हें एक प्रकारचें कोडें प्रथम त्याचे मनांत उभें राहून तें सोडविण्याचें त्यास फार जड जातें. श्रीमंत लोकांना मात्र येथें पैशाच्या साह्यानें जशी हवी तशी आपली सोय लावून घेतां येते तशी गरीब लोकांना मुळींच लावतां येत नाहीं. शहराच्या मध्यभागीं कावसजी पटेल यांच्या तलावानजीक परस्परांपासून फारच थोडथोड्या अंतरावर फक्त तीन धर्मशाळा बांधलेल्या आहेत; त्या ज्या उदार व परोपकारी सद्गृहस्थांनीं बांधून ठेवलेल्या आहेत त्या सत्पुरुषांचे धर्मशाळेंत उतरणाऱ्या उतारूंनीं जेवढे उपकार मानावे तेवढे थोडेच होणार आहेत. कारण जर ह्या तीन धर्मशाळा मुंबईस बांधलेल्या नसत्या तर बाह्यगांवच्या गरीब लोकांना येथें पाय ठेवावयास जागाच नव्हती असें म्हणण्यांत मुळींच अतिशयोक्ति होणार नाहीं. आतां वाळकेश्वर व महालक्ष्मी येथें कांहीं धर्मशाळा आहेत परंतु त्या शहराच्या एक बाजूस असल्यामुळें बाहेरगांवचे उतारूंना त्यांचा मुळींच उपयोग होत नाहीं.

## शेठ गुरुमुखराय सुखानंद दिगंबर जैन धर्मशाळा.

( १ ) ही धर्मशाळा कावसजी पटेल तलावानजीक गोपाळदास बर्फीवाला याचे दुकानासमोर आहे. या धर्मशाळेची इमारत दगडी बांधलेली असून हींत सोयी फार उत्तम केलेल्या आहेत. येथें जैन व उच्च वर्णाचे हिंदु गृहस्थांना उतरण्याची मोकळीक आहे. ह्या धर्मशाळेंत दरवाज्यानजीक एक ऑफीस आहे तेथें जाऊन उतारूनें मॅनेजरास भेटावें.

( २ ) येथें उतारू लोकांकरितां खालीं तळमजल्यावर दोन्हीं बाजूस सामान ठेवण्यासाठीं भिंतींत काढलेलीं कांहीं कपाटें आहेत व पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या मजल्यांवर कांहीं खोल्या आहेत. येथें उतारूकडून कपाटाबद्दल २ रुपये व खोलीबद्दल ५ रुपये डिपाझिट ( अनामत ) घेत असतात.

( ३ ) या धर्मशाळेंत क, ख, ग, असे तीन मजले आहेत. पैकीं क मजल्यावरील फक्त नं. १ व २, ग मजल्यावरील नं. २ व ३ च्या खोल्या शेठ सुखानंदजी यांचे आज्ञेशिवाय कोणत्याही उतारूंस मिळणार नाहींत. तसेंच ख मजल्यावरील नं. १ ते ७ च्या खोल्या फक्त दिगंबर जैन लोक यांनाच देण्याची मोकळीक आहे.

( ४ ) येथें उतारूंस ८ दिवस राहूं देण्याची परवानगी आहे. येथें स्वयंपाकास लागणारीं सर्व प्रकारचीं भांडीं; तसेंच अंथरण्यास सत्रंजी, गादी, जाजम वगैरे सामान मिळतें. ८ दिवसास स्वयंपाकाचे भांडींबद्दल प्रत्येकीं पाव आणा व अंथरण्याचे सामानाबद्दल अर्धा आणा पडतो.

( ५ ) विजेच्या बत्तीबद्दल अर्ध रात्रीस एक आणा व सबंध रात्रीस दोन आणे पडतात.

( ६ ) उतारूनें घेतलेल्या सामानाबद्दल एक छापील पावती मिळत असते. तिजवरून खोली किंवा कपाट खालीं करतेवेळीं उतारूनें घेतलेल्या सामानाबद्दल हिशेबानें डिपाझिट ठेवलेल्या रकमेंतून वाजवी पैसे कापून घेऊन बाकीचे पैसे परत देतात.

( ७ ) धर्मशाळेचा दरवाजा स्टँडर्ड ९ ला बंद होतो व दरवाजाची खिडकी ११॥ ला बंद होते.

धर्मशाळेसंबंधीं उतारूंस कोणत्याही प्रकारची तक्रार करणें झाल्यास, त्यांनीं सुपरिंटेंडंट यांस भेटावें अगर ऑफीसांत ठेवलेल्या व्हिजिटबुकांत मनेच्छित शेरा द्यावा.

---

## शेठ हिराचंद्र गुमानजी जैन धर्मशाळा.

### हिराबाग.

ही धर्मशाळा माधवबागेनजीक कांदेवाडीचे नाक्यावर असून ती सुरतनिवासी दिगंबर जैन विसा हुंबड स्वर्गवासी शेठ हिराचंद गुमानजी यांचे चिरंजीव मोतीचंद, पानाचंद, माणकचंद, व नवलचंद यांनीं आपल्या तीर्थरूपाचे स्मरणार्थ बांधाविली असून हिला एकंदर सवा लक्ष रुपये खर्च आलेला आहे. ह्या धर्मशाळेंत जैन लोक व उच्च वर्णाचे हिंदु लोक यांना उतरण्याची मोकळीक आहे. उतारूनें पहिल्या मजल्यावर एक ऑफिस आहे तेथें जाऊन मॅनेजरास भेटावें.

ह्या धर्मशाळेंतील सुपेरिंटेंडंट ऑफिसाचे वरील दिवाणखाना ए. नं. २ आणि बी ब्लाक नं. १२।१३ च्या खोल्या सेक्रेटरीचे परवानगीशिवाय कोणत्याही उतारूंस मिळणार नाहींत. तसेंच बी ब्लाक नं. १ ते ७ चया खोल्या फक्त दिगंबर जैन लोकांनाच मिळूं शकतील. येथें उतारूंस खोलीबद्दल ५ रुपये डिपाझिट ( अनामत ) ठेवावे लागतात.

या धर्मशाळेंत उतारूंस ८ दिवस राहण्याची परवानगी असून, उतारूस उपयोगी असें सामान येथें देखील मिळत असतें. ८ दिवसांस स्वयंपाकाचे भांड्यांबद्दल पाव आणा व अंथरण्याचे सामानास एक आणा पडतो. विजेच्या बत्तीबद्दल अर्ध रात्रीस अर्धा आणा व सबंध रात्रीस एक आणा द्यावा लागतो.

उतारूनां खोली सोडते वेळीं घेतलेल्या सामानाबद्दल हिशेबानें डिपाझिट ठेवलेल्या रकमेंतून वाजवी पैसे कापून घेऊन बाकीचे पैसे परत

देतात. धर्मशाळेचा दरवाजा रात्रींचे ११॥ वाजतां बंद करीत असतात. नाटक वगैरे पहावयास बाहेर जावयाचें झाल्यास भय्यास सुचना करून जावें.

ह्या धर्मशाळेविषयीं उतारूंना कोणत्याही प्रकारची तक्रार करणें झाल्यास त्यांनीं अर्ज लिहून पाकिटांत बंद करावा व तें पाकिट ऑफिसांत ठेवलेल्या पत्र टाकण्याचे पेटींत टाकावें.

## शेठ मुळजीभाई माधवदास धर्मशाळा.

ही धर्मशाळा माधवबागेनजीक कावसजी पाटील यांच्या तलावासमोर असून, ती मुंबईचे कपोळवाणी स्वर्गवासी शेठ मुळजीभाई माधवदास यांनीं धर्मकृत्यार्थ ठेवलेल्या ऐवजांतून त्यांचे बंधू वरजीवनदास व नरोत्तमदास माधवदास ह्यांनीं उच्च वर्णाच्या हिंदु प्रवासी लोकांच्या उपयोगासाठीं शके १८०० मध्यें बांधली असून, हीस एकंदर ५७२३० रुपये खर्च आलेला आहे.

या धर्मशाळेंत तळमजल्यावरील ओट्यावर व आंतील मोकळ्या जागेवर फुकट उतरूं देतात. तळमजल्यावर व पहिल्या मजल्यावर ज्या कांहीं खोल्या आहेत त्या उतारूंस हव्या असल्यास त्याबद्दल ५ रूपये डिपाझिट ठेवावे लागतात. ह्याबद्दल पावती वगैरे कांहींच मिळत नाहीं. ह्या डिपाझिट ठेवलेल्या रकमेपैकीं खोली सोडतेवेळीं उतारूंस २॥ रुपये परत मिळतात व बाकीचे २॥ रुपये खोलीबद्दल कापून घेण्यांत येतात. येथें भांडीं वगैरे कोणतेंही सामान उतारूंस मिळत नाहीं. उतारूंस येथें ८ दिवस राहूं देण्याची परवानगी असून धर्मशाळेचा दरवाजा रात्रीं स्टँडर्ड टाईम ११ वाजतां बंद करितात.

## मुंबईची सामान्य माहिती.

मुंबईची परिस्थिति—इ० स० १६६१ मध्यें पोर्तुगाल येथील एका राजानें इंग्लंडचे राजे दुसरे चार्लस ह्यांना मुंबई हें बेट आंदण दिलें.

त्या वेळीं हें बेट अगदींच लहानसें एक खेडें होतें, व त्यांत कोळी लोकांची वस्ती विशेष होती. पूर्वीं येथें बरींच लहानलहान बेटें होतीं, परंतु हें बेट आपल्या दयाळु इंग्रज सरकारचे ताब्यांत आल्यावर, प्रथम सरकारनें अत्यंत श्रम घेऊन मधील पाण्याचे भाग भरून काढले व त्या भागांचें हें एक मोठें सुंदर बेट बनविलें; एवढेंच नव्हे तर केवळ शंभर वर्षांत सरकारनें ह्या बेटाची इतकी सुधारणा केली आहे कीं, हल्लीं जी आपणांस ह्या शहराची स्थिति दृष्टिगोचर होत आहे; तद्वत् त्याची स्थिति पूर्वी मुळींच नव्हती. पूर्वींच्या व हल्लींच्या स्थितींत महदंतर पडलें आहे, पूर्वी ज्या स्थळीं पाण्यावांचून कांहींच दृष्टीस पडत नव्हतें, त्या स्थळीं आज मोठमोठ्या भव्य व टोलेजंग इमारती, मोठमोठे प्रेक्षणीय बाग व नवीन नवीन अफाट यांत्रिक कारखाने दृष्टीस पडूं लागले आहेत. तसेंच हल्लीं जगांतील बहुतेक भागाशीं मुंबई बंदराचा व्यापार चालत असल्यामुळें, सर्व देशांहून आलेल्या आगबोटींनीं, जहाजांनीं हें बंदर नेहमीं गजबजलेलें दिसूं लागलें आहे. दिल्ली, आग्रा, कलकत्ता, लखनौ वगैरे हिंदुस्थानांतील हजारों शहरें तेथील भव्य टोलेजंग इमारती, तसेंच मनोवेधक मनोरे यांनीं युक्त आपापलें प्राचीन ऐतिहासिक वैभव दाखवीत आहेत ही गोष्ट निर्विवाद आहे; तरी पण विद्या, व्यापार व तदंगभूत संपत्ति इत्यादि गोष्टींत मुंबईची बरोबरी करणारें शहर सर्व हिंदुस्थानांतच नव्हे तर लंडनशिवाय करून ब्रिटिश राज्यांत मुंबईसारखें सर्वतोपरी मोठें असें कोणतेंच शहर नाहीं. ह्यामुळें मोठमोठे नामांकित व्यापारी, कारखानदार, सरकारी अमलदार, कारकून पेशाचे लोक, कारखान्यांत काम करणारे मजूर, व्यापारासाठीं आलेले परदेशांतील लोक वगैरे सर्व जातीचे व सर्व धंद्याचे लोक येथें आहेत.

**मुंबईची स्वाभाविक रचना**—हें बेट साधारणपणें सपाट असून, याचे पूर्वेस व पश्चिमेस थोडे डोंगर व कांहीं टेंकड्या आहेत; पैकीं वरळी, शिवडी व माजगांव येथील डोंगर फोडून टाकल्यामुळें आतां त्याचे कांहीं

भाग शिल्लक आहेत. ह्या बेटाचा दक्षिण भाग चिंचोळा असून मध्यभाग व उत्तरभाग हे रुंद आहेत. ह्या बेटाची बहुतेक जमीन समुद्रांतून घेतलेली आहे. आणि उत्तरेकडील भाग ठाणें जिल्ह्यांतील साष्टी व वांद्रे या बेटांस पुलांनीं जोडून काढिला आहे. ह्या बेटाची लांबी दक्षिणोत्तर सुमारें १२ मैल असून, पूर्व पश्चिम रुंदी सुमारें ३ मैल आहे.

**मुंबईची व्यवस्था**—ह्या शहराची व्यवस्था ठेवण्याचें काम म्युनिसिपालिटी पाहात असून हिच्या सभेस कार्पोरेशन असें म्हणतात. ह्या कार्पोरेशनमध्यें कांहीं शहरांतील सभ्य लोक व कांहीं सरकार मिळून सभासद नेमून देत असतात. असे एकंदर येथें १०६ सभासद आहेत. म्युनिसिपालिटीस शहरांत स्वच्छता व आरोग्य राखणें, प्राथमिक शिक्षण देणें, पाण्याचा पुरवठा करणें, देवी काढणें, जन्ममृत्यूंची नोंद ठेवणें वगैरे कामें मुख्यत्वेंकरून करावीं लागतात. कामाच्या सोयीसाठीं निरनिराळीं खातीं काढलेलीं असून, त्यांचेकडे जीं जीं कामें नेमून दिलेलीं आहेत त्या त्या कामानुरूप त्यांचीं नांवें ठेवण्यांत आलीं आहेत.

**इंप्रुव्हमेंट ट्रस्ट**—ह्या नांवाचें एक खातें सुरू केलेलें आहे. ह्या खात्याकडे जुन्या इमारती पाडून शहरांतील रस्ते रुंद करणें, शहरांत प्रकाश व हवा भरपूर मिळण्याची व्यवस्था ठेवणें, नवीन इमारती बांधणें वगैरे कामें सोंपविलीं आहेत.

**डेव्हलप्मेंट**—ह्या नांवाचें एक खातें आहे. ह्या खात्याकडे शहराची व घरांची वाढ करण्याचें काम सोंपविलें आहे.

**शिक्षणखातें**—शिक्षणाप्रीत्यर्थ स्कूल्स कमिटी नेमून तिचेकडे सर्व प्रकारच्या प्राथमिक शिक्षणाची व्यवस्था ठेवण्याचें काम सोंपवून दिलें आहे. हिचे ताब्यांत मराठी, गुजराथी, व उर्दू मिळून एकंदर सुमारें सवातीनशें शाळा आहेत.

**पिण्याच्या पाण्याचा पुरवठा**—येथील म्युनिसिपालिटीनें ठाणें जिल्ह्यांत विहार, तुळशी व तान्सा ह्या ठिकाणीं मोठमोठे तलाव बांधून त्यांतील

पाणी लोखंडी नळांनीं आणून तें मुंबईस चौपाटीनजीक वाळकेश्वराचे डोंगरावर एक मोठा रिझरव्हायर ( तलाव ) बांधून त्यांत सोडलें आहे.

( १ ) **विहारचा तलाव**—हा तलाव मुंबईहून सुमारें १५।१६ मैलांवर असून जी. आ. पी. रेल्वेच्या भांडूप स्टेशनापासून ४ मैल लांब आहे. हा तलाव बांधून काढण्यास सुमारें ६५ लक्ष रुपये खर्च आलेला आहे. हा तलाव एक लहानसा उपसागरच आहे असें दिसतें. ह्या तलावावर मोठा बंदोबस्त असून येथें म्युनिसिपालिटीचे कामगार लोक असतात. ह्या तलावाचें पाणी इ० स० १८६० सालीं मुंबईस नळानें आणलें.

( २ ) **तुळशीचा तलाव**—इ० स० १८७२ सालीं विहारच्या तलावाचें पाणी शहरास पुरेनासें झालें, त्यामुळें पुनः कमेटीनें मुंबईपासून सुमारें २२ मैलांवर साष्टी तालुक्यांतील कान्हेरी पर्वतांत तुळशीचा तलाव बांधून काढला. ह्यास सुमारें तेहतीस लक्ष रुपये खर्च आलेला आहे. विहार व तुळशी ह्या दोन्ही तलावांत अंतर सुमारें १। मैलाचें आहे. ह्या तलावाचें पाणी इ० स० १८७५ सालीं मुंबईस आणलें.

( ३ ) **तान्सा तलाव**—हा तलाव सर्वांत मोठा असून येथून सुमारें ३१ मैलांवर आहे. वरील दोन्ही तलावांचें पाणी शहरास पुरेनासें झाल्यामुळें इ० स० १८९१ सालीं हा तलाव बांधून त्याचें पाणी १८९४ सालीं मुंबईस आणलें.

हल्लीं जरी या तिन्ही तलावांचें पाणी मुंबईस आणलेलें आहे तरी देखील त्यांचें पाणी सकाळ संध्याकाळ मिळून फार तर ८।९ तासच मिळूं शकतें. उन्हाळ्यांत तर याहीपेक्षां कमी तास मिळूं शकतें.

**लोकवस्ती**—लोकवस्तीच्या मानानें पाहूं गेलें असतां सबंध हिंदुस्थानांत मुंबईशहराएवढी अफाट वस्ती अन्यत्र कोणत्याही शहरीं आढळत नाहीं. येथें बहुतेक पृथ्वींतील सर्व मानवजातींच्या मनुष्यवर्गांचें

जणुं काय एक प्रदर्शनच दृष्टीस पडतें. ह्या शहरांत अनेक जातींचे, अनेक धर्मांचे व अनेक पंथांचे लोकांची लोकवस्ती असल्यामुळें, ह्या शहरास कित्येक लोक '**बकाली शहर**' असेंही म्हणतात. येथें अनेक भिन्न भिन्न जातींच्या लोकांचा परस्परांशीं संबंध येत असतो; त्यामुळें परधर्मी मनुष्याशीं देखील सलोख्यानें वागण्याचा गुण मुंबईतील रहिवाशी लोकांमध्यें विशेष आलेला आहे.

**लोकवस्तीचें ठोकळ प्रमाण**—दक्षिणी लोकांची वस्ती—गिरगांव, माजगांव, परेल, माटुंगा, वरळी, माहीम व शींव; गुजराथी लोकांची वस्ती—भुलेश्वर, भोईवाडा, काळबादेवी, कोट, व मांडवी. पारशी लोकांची वस्ती—खेतवाडी, ठाकुरद्वार, मरीनलाइन्स, कोट व ग्रँटरोड; मुसलमान लोकांची वस्ती—नळबाजार, डोंगरी, चकला व माहीम; युरोपिअन लोकांची वस्ती—कोट, वाळकेश्वर व भायखळा; खिस्ती लोकांची वस्ती—गिरगांव व माहीम. पंचमेळ वस्ती—शेतवळी, कुंभारवाडा, डंकन रोड, नागपाडा व माटुंगा. व्यापारी वस्ती—ज्या ठिकाणीं व्यापाराची विशेष सोय असेल व व्यापारासंबंधीं घडामोडी जेथें सुलभ रीतिनें करितां येतील अशा ठिकाणीं ह्यांची वस्ती विशेष आहे.

**इमारतींची रचना**—मुंबईत वस्ती अगदीं दाट असल्यामुळें, मुंबईतील इमारती परस्परांस अगदीं गच्च भिडून गेल्या आहेत. त्यामुळें इमारतीपुढें ऐसपैस जागा किंवा पाठीमागें मोकळी जागा मुळींच नसते. येथें कोणतीही इमारत बांधतांना तींत शक्य तेवढ्या सोई करण्याचा कसून प्रयत्न करितात; तसेंच पुष्कळ ठिकाणीं जागा सोयस्कर नसल्यामुळें त्या इमारतींत हव्या तशा सोई करतां येत नाहींत; त्यामुळें पंधरावीस घरांत हवा येण्यास मुळींच जागा नसून जणूं काय तीं एकच आहेत अशीं दिसतात. एकाच माडींत लांबचे लांब वीस पंचवीस बिऱ्हाडें राहण्याची सोय ज्या माडींत केलेली असते तीस

चाळ ' असें म्हणतात. कोठें कोठें एकेक घर म्हटलें म्हणजे कोणाचें पांच मजली, कोणाचें सहा मजली, कोणाचें सात मजली अशीं एकाहून एक सुंदर हजारों इमारतींचीं उसळलेली गर्दी प्रेक्षकांच्या दृष्टीस पडते. सहज एकाद्याचे मनांत आलें कीं, एकादी इमारत खालपासून वरपर्यंत नीट न्याहाळून पहावी; तर त्यास आपल्या डोकींतील पागोटें किंवा टोपी नीट सांवरल्यावांचून ती इमारत पाहतां येणें शक्यच नाहीं. सर्व हिंदुस्थानांत मुंबई शहरासारखी जागेची दुर्मिळता व घरभाडें इतर कोणत्याही शहरीं नसेल.

**रहिवाशांची रीतभात**—हिंदु लोकांची राहण्याची रीतभात अगदीं साधी असते, व त्या ठिकाणीं बहुतकरून स्वच्छताही असते. वाणी भाटे यांचे घरांत विशेष स्वच्छता व टापटीप दिसून येते. लहानशा जागेंत जेथली वस्तु तेथेंच व्यवस्थेशीर ठेवण्याची कला ह्या लोकांना विशेष साधली आहे. पारशी लोकांची घरें बाहेरून पाहणारांस मात्र झकपक दिसतात. आपल्या मराठी भाषेंतील 'अंगणावरून घराची परिक्षा' या म्हणीप्रमाणें ह्यांचे घरांत किती स्वच्छता रहात असेल ह्याची कल्पना वाचकांनींच करावी. कारण ह्या लोकांच्या घरापुढील अंगणांत माशांचीं हाडें, कोंबड्यांची विष्ठा, मुलांचें मलमूत्र वगैरे प्रकारची घाण बहुतेक ठिकाणीं आढळून येते. ह्या लोकांच्या माडीखालून जावयाचें असल्यास फारच जपून जावें लागतें. कारण केव्हां वरून अंगावर काय पडेल ह्याचा मुळींच नेम नसतो. आतां अशी स्थिति सर्वत्रच आहे असें मात्र समजूं नये. असें आहे तरी त्यांच्यांत **नित्य सकाळीं ओटीवर अगर पुढें मोकळी जागा** असल्यास तेथें **सडासंमार्जन करून** रांगोळ्या **घालण्याचा व सायंकाळीं** चंदनाचा **चुरा विस्तवावर ठेवून त्याचा** धूप सर्व **घरभर देण्याचा प्रघात फार उत्तम आहे.** हा प्रघात मात्र सर्वांना अनुकरणीय असा आहे ह्यांत मुळींच संशय नाहीं. तसेंच युरोपि-

अन लोकांची राहण्याची रीतभात अगदीं उत्तम असून घरांत स्वच्छता व टापटीप ठेवण्यांत ते अगदीं पटाईत असतात. मात्र ह्या लोकांचे भटारखान्यांत अतिशय घाण असते.

**मुंबईस दृष्टिगोचर होणारे देखावे**—मुंबईस सहज फिरावयास निघालें असतां नानाप्रकारचे देखावे दृष्टीस पडतात. कित्येक गुलहौशी लोक रस्त्यांतून गाणीं गात चालले आहेत; कित्येक तांबोळ्याचे दुकानीं पानपट्टी घेऊन खात आहेत; कित्येक मार्गानें विड्यांचे धूर सोडीत चालले आहेत; कोणी नाटकांच्या किंवा औषधी वगैरेंच्या जाहिराती वांटीत आहेत; कोठें गारुडी चव्हाट्यावर तमाशा करीत बसला आहे व त्याचे भोंवतीं रिकामटेकडी गुलहौशी मंडळी जमली आहे; कोणी उपहारगृहांत फराळ करीत बसले आहेत; कोणी मारामारी, तंटे भांडणें करीत आहेत; व त्यांना पोलिस पकडून नेत आहेत व ती मजा पहावयास लोकांचे थवेचे थवे जमत आहेत; कित्येक उनाड मुलें त्यांची हुर्यो करीत आहेत; कोणी दुकानदार गिऱ्हाइकांस माल देण्यांत गुंग बनले आहेत; कोणी गिऱ्हाइकापासून पैसे घेत आहेत; कोणी ट्रामगाडीची मार्गप्रतीक्षा करीत आहेत; कोणी ट्राम येतांच तींत चढण्याची उतावीळ करीत आहेत; कोणी उतरण्याची उतावीळ करीत आहेत; ह्याप्रमाणें कोणी कांहीं व कोणी कांहीं असे हजारों लोक नानाप्रकारचे रंग करीत असलेले नानाविध देखावे पाहून, बाहेर गांवाहून आलेला नवीन मनुष्य अगदीं आश्चर्यचकित होऊन जातो.

---

## ट्रामगाड्यांची माहिती.

**ट्रामगाड्या**—ह्या गाड्या आऊट्राम नांवाच्या एकागृहस्थानें प्रथम सुरु केल्या. म्हणून त्याचेच नांवावरून ह्या गाड्यांना ट्रामगाड्या हें नांव देण्यांत आलें. हल्लीं मुंबईत ह्या गाड्या विजेच्या सहाय्यानें चालविण्याची

सोय केली आहे. पूर्वी ह्या गाड्यांना येथें घोडे जुंपीत असत. ह्या ट्राम-गाड्यांना चालविण्यासाठीं शहरांत सडकेवर आगगाडीच्या रुळाप्रमाणें रूळ पसरविलेले आहेत. मात्र ट्रामगाडीचे रूळ मध्यें खोलगट असून जमिनींत पुरलेले आहेत. प्रत्येक ट्रामगाडींत सुमारें ४०।५० मनुष्यें बसूं शकतात. कांहीं गाड्यांना दोन ट्रामा एकत्र जोडून चालवितात व कांहीं गाड्या दुमजली बनविलेल्या असतात. ह्यांत सुमारें ९०।१०० मनुष्यें बसूं शकतात. आगगाडीच्या योगानें भिन्न भिन्न नियमित ठिकाणींच जातां येतें, पण ह्या ट्रामगाडीच्या योगानें शहराच्या बहुतेक भागांत जातां येतें. ह्या गाड्यांचा वेग सुमारें दर तासीं १०।१२ मैल प्रमाणें असतो. ह्या गाड्या सकाळीं चार पांच वाजेपासून सुरु होऊन, रात्रीचे नऊ दहा वाजेपर्यंत सर्वत्र सारख्या चालत असतात. पुढें कांहीं गाड्या मुख्य मुख्य रस्त्यांवर तुरळक रात्रीचे दीड दोन वाजेपर्यंत चालत असतात. प्रत्येक ट्रामगाडींत स्त्रियांकरितां स्पेशल दोन बांक ठेवलेले असतात व प्रत्येक गाडींतील दोन्ही रांगेंतील शेवटचे तीन बांकावर बसलेल्या उतारूंना विडी ओढण्याची मोकळीक असते.

**ट्रामगाड्या सोडण्याचीं ठिकाणें**—भायखळा, फोरॅसरोड, कुलाबा येथें ट्रामगाड्या ठेवण्यासाठीं मोठमोठे तबेले बांधलेले आहेत. कोणतीही ट्रामगाडी चालवावयाची नसल्यास वरील तबेल्यांत नेऊन सोडतात.

**ट्रामगाड्यांचे कारखाने**—माझगांव व दादर येथें आहेत.

**ट्रामगाड्या थांबविण्याचीं ठिकाणें**—ह्या गाड्या थांबविण्याचीं सुमारें एकेक फर्लांगाचे अंतरा अंतरावर अनेक ठिकाणें केलेलीं आहेत हीं ठिकाणें सहज समजावीं म्हणून ट्रामगाड्यांच्या मार्गानें दोन्हीं बाजूंस खांबांना, ह्या बाजूची गाडी येथें थांबते, अशीं अक्षरे लिहिलेल्या पाट्या लावलेल्या आहेत. अशा ठिकाणीं गाडी थांबली म्हणजे उतारूनें

गाडींत चढावें अगर गाडींतून उतरावें. मात्र चढतेवेळीं ट्रामगाडीच्या मागच्या दरवाज्यानें चढावें व उतरतेवेळीं पुढील दरवाजानें उतरावें.

**ट्रामगाड्यांचीं तिकीटें**—ट्रामवे कपनीनें शहरांतील सर्व रस्त्यांचे ठराविक तीन भाग केले आहेत. ह्यांपैकीं कोणत्याही दोन भागांत प्रवास करणें झाल्यास, प्रत्येक तिकीटास मनुष्यांस एक आणा व दहा वर्षांचे आंतील मुलांस अर्धा आणा पडतो. व तीनही भागांत प्रवास करणें झाल्यास मनुष्यास दीड आणा व मुलास पाऊण आणा पडतो. तीन वर्षांचे आंतील मुलांस तिकीट काढावें लागत नाहीं. हीं तिकीटें देणारास 'कंडक्टर;' गाडी हांकणारास 'ड्रायव्हर' तसेंच मध्यंतरीं गाडींत येऊन जो तिकीटें तपासतो त्यास 'इन्स्पेक्टर' असें ह्मणतात.

**जंक्शन स्टेशनें**—ट्रामवेच्या एका फांट्यास विरुद्ध दिशेंतील दुसरा फांटा जेथें कापून जातो त्या ठिकाणास जंक्शन स्टेशन असें म्हण-तात. ट्रामगाड्यांचीं एकंदर स्टेशनें ३८ आहेत. ह्यांपैकीं आपणांस जेथें जावयाचें आहे तेथें जाण्यासाठीं जर मध्येंच एकादें जंक्शन स्टेशनवर गाडी बदलावी लागत असल्यास तेथें त्या गाडींतून उतरून विरुद्ध लाइनींतील आपल्या इच्छित स्थळाकडे जाणाऱ्या ट्रामगाडींत जाऊन बसावें. मात्र पहिल्या गाडींत काढलेलें तिकीट जवळ असूं द्यावें. हें तिकीट जवळ नसल्यास पुन: दुसरें तिकीट काढावें लागेल.

**ट्रामवेचे रस्ते**—ट्रामवेच्या रस्त्याचा आरंभ कुलाब्यास ससून डॉक पासून होऊन म्युझियम पर्यंत आल्यावर तेथें त्याचे म्युझियम वेस्ट व म्युझियम इस्ट असे दोन फांटे झाले आहेत. शहराच्या निरनिराळ्या भागांत ट्रामगाडीचे जे रस्ते पसरलेले आहेत त्यांविषयीं सविस्तर माहिती दिली आहे. (विशेष माहितीकरितां ट्रामगाडीचे रस्त्यांचा नकाशा पहावा.)

**( १ ) दोनपैकीं पहिला फांटा–म्युझियम ते दादर व्हाया कालबादेवी**—म्युझियम वेस्टहून ( हार्नबी रोडनें ) फ्लोरा फाउंटेन, बोरीबंदर जं. ( क्रुकशांक रोडनें ) धोबीतलाव जं. वर येऊन तेथून कालबादेवी रोडनें पायधुणी जं. ( परेल रोडनें ) भेंडीबाजार जं., जे. जे. हॉस्पिटल जं., भायखळा ब्रिज जं., व्हिक्टोरिया गार्डन, लालबाग, परेल वरून दादरपर्यंत गेला आहे. (या रस्त्यानें १ नंबरची ट्राम दादर-पर्यंत; ४ नंबरची ट्राम राणीचे बागेपर्यंत व ५ नंबरची ट्राम जे. जे. हॉस्पिटलपर्यंत जाते. )

**( २ ) म्युझियम ते दादर, व्हाया गिरगांव**—वरील पहिल्या फांट्यास पुनः एक दुसरा धोबी तलावापासून निघून ( गिरगांव रोडनें ठाकुरद्वारवरून गिरगांव पोर्तुगीज चर्च जं. ( बाळाराम स्ट्रीटनें ) प्रार्थना समाज, चर्नीरोड जं., फोरॅसरोड जं., उभा पारशी जं., हून ( क्लिअर-रोड वरून ) भायखळा पुलाजवळ दादरला जाणाऱ्या पहिल्या फांट्यास मिळाला आहे. ( या रस्त्यानें ६ नंबरची ट्राम दादरला व ७ नंबरची ट्राम राणीचे बागास जाते )

**(३) दोनपैकीं दुसरा फांटा, म्युझियम इस्ट ते ग्रँटरोड व ताड-देव**—हा फांटा म्युझियम इस्टहून ( गव्हरमेंट डॉक यार्ड, टाऊन हॉल, टांकसाळ यांवरून ) बेलार्ड पिअर, ( मिंटरोडनें जनरल पोस्ट ऑफि-सावरून ) बोरीबंदर जं., ( हार्नबीरोडनें म्युनिसिपल ऑफिस, सिताराम बिल्डिंग हेडपोलीस ऑफिस यांवरून ) क्राफर्ड मार्केट जं., ( अबदुल रहिमान स्ट्रीटनें ) पायधुनी जं., ( बापू खोटे स्ट्रीटनें ) नळबाजार जं., ( फाकलंडरोडनें ) गोलपिठा जं., ग्रँटरोड कार्नर जं., वरून ताडदेव येथें गेला आहे. ( या रस्त्यानें १३ नंबरची ट्राम ताडदेवास व १९ नंबरची ट्राम ग्रँटरोड येथें जाते.

( ४ ) **धोबीतलाव ते रे रोड**—धोबीतलावापासून एक स्वतंत्र फांटा निघून तो स्मॉलकाज कोर्टवरून क्राफर्ड मार्केट जं., कॅरनॉक बंदर जं., ( फ्रिअररोडनें ) प्रिन्सेस डॉक जं. हून रे रोडपर्यंत गेला आहे. ( या रस्त्यानें २० नंबरची ट्राम जाते )

( ५ ) **सी. पी. टॅंक ते जेकब सर्कल**—हा फांटा माधवबागेहून कावसजी पाटील यांच्या तलावावरून निघून नळबाजार जं., ( डंकन-रोडनें ) राऊंड टेंपल जं., दोनटांकी जं., उमापारशी, ( मदनपुरा ) यांवरून जेकब सर्कलपर्यंत म्हणजे सात रस्त्यापर्यंत गेला आहे. ( या रस्त्यानें १२ नंबरची ट्राम जेकब सर्कलला जाते व १८ नंबरची ट्राम म्युझियम इस्टला जाते.

( ६ ) **मांजगांव ते ग्रँटरोड**—ग्रँटरोडचे पुलापासून हा एक स्वतंत्र फांटा निघून ( ग्रँटरोडनें ) चर्नीरोड जं., ग्रँटरोड कार्नर जं., दोनटांकी जं., जे. जे हास्पिटल जं. वरून ( बाबुला टॅंकरोडनें ) मांजगांवपर्यंत गेला आहे. ( या रस्त्यानें १० नंबरची ट्राम जात येत असते ) हा रस्ता गवालिया तलावापर्यंत नेण्याचें काम सुरूं आहे.

( ७ ) **आपेरा ते फ्लोराफाउंटन**—हा एक स्वतंत्र फांटा आपेरा हाऊसपासून निघून गिरगांव पोर्तुगीज चर्च जं., ( गिरगांव रोडनें ठाकुरद्वारपासून ) धोबीतलाव जं., ( एक्स्प्लेनेड रोडनें ) फ्लोरा फाउंटन-पर्यंत गेला आहे. ( या रस्त्यानें ८ नंबरची ट्राम जात असते. )

( ८ ) **टांकबंदर ते बेलार्ड पिअर**—हा स्वतंत्र फांटा टांकबंदर येथून निघून रे रोड, ( फ्रिअर रोडनें ) प्रिन्सेस डॉक जं०, कॅरनॉक बंदर जं०हून बेलार्ड पिअर येथें गेला आहे. ( या रस्त्यानें १९ नंब-रची ट्राम जात येत असते.

( ९ ) **सँडहर्स्ट ब्रिज ते टांकबंदर व बेलार्ड पिअर**—हा फांटा सँडहर्स्ट ब्रिजहून निघून सँडहर्स्ट रोडनें प्रार्थना समाज जं०, गोल-

पिठा जं०, राउंड टेंपल जं०, भेंडीबाजार जं०, ( उमरखाडी, डोंगरी, एल्फिन्स्टन ब्रिज यांवरून ) प्रिन्सेस डॉक जं० हून डावे हातानें रे रोड-हून टांकबंदर व उजवे हातानें कॅरनॉक बंदर जं० हून बेलार्ड पिअर येथें गेला आहे. ( या रस्त्यानें २१ नंबर ट्राम टांकबंदर व १९ नंबरची ट्राम बेलार्ड पिअर येथें जाते.

## ट्रामगाडीच्या तिकीटाविषयीं माहिती.

ट्रामवे कंपनीनें आपल्या लहानशा तिकीटांत सर्व स्टेशनांचीं नांवें, दिवस, वेळ वगैरे पुष्कळ प्रकारच्या सोयी काढल्या आहेत हें खालीं दिलेल्या माहितीवरून वाचकांस कळून येईल.

पहिले सदरांत तिकीट नंबर व किंमत दिलेली असते.

### दिवस व वेळ.

या दुसऱ्या सदरांवरून तिकीट कोणते दिवशीं व किती वाजतां घेतलें हें दिवसाच्या व वेळेच्या लाईनींत कंडक्टरनें कापून दिलेल्या भागावरून समजतें. ( ह्यामुळें तें तिकीट फक्त तास सव्वातास चालू शकतें त्यापुढें चालत नाहीं. )

### पासून पर्यंत

या तिसऱ्या सदरांत असलेल्या दोन सदरांवरून कंडक्टरनें पहिल्या-सदरांत कापून दिलेल्या नंबरचे स्टेशनापासून दुसऱ्या सदरांत कापलेल्या नंबरचे स्टेशनापर्यंत जावयाचें आहे एवढें समजतें.

### बदल करा

या चौथा सदराची माहिती खालीलप्रमाणें समजावी. या सदरांतील 'दा' या अक्षरावरून दादर व्हाया काळबादेवी लाईन; 'क्रि' या अक्षरावरून क्रिअररोड व्हाया गिरगांव लाईन; 'ग्रँ' या अक्षरावरून ग्रँटरोड व ताडदेव लाईन; 'जे' या अक्षरावरून जेकबसर्कल लाईन; 'मां' या अक्षरावरून मांजगांव लाईन; 'सा' या अक्षरावरून म्युझियम ते

सासून डॉक लाईन; 'सँ' या अक्षरावरून सँडहर्स्टरोड लाईन; धो या अक्षरावरून धोबीतलाव ते रे रोड, व्हाया कॅरनॉक बंदर; 'स्पेशल' या ट्रामवेवर नंबर दिलेला नसतो. मात्र इंग्लिशमध्यें 'एक्स्ट्रा' असें लिहिलेलें असतें. ह्याप्रमाणें या सदरांतलि लाइनींची माहिती झाली. आतां या सदरांत ज्या लाइनीच्या गाडींतून उतरून ज्या ज्या नंबरच्या स्टेशनावर गाडी बदल करावयाची असेल त्या त्या लाइनींतील सदरांत त्या त्या नंबराखालीं दरेक गाडींतील कंडक्टर तेवढा भाग कापून देत असतो. यावरून कापलेल्या ठिकाणीं गाडी बदल करावयाची असें आपण समजावें. एकादे वेळेस दोन वेळां देखील गाडी बदल करावी लागत असते. उदा० समजा सी. पी. टँकला ट्रामवेंत बसून आपणांस टांकबंदर येथें जावयाचें आहे सबब आपणांस तिकीटांत 'बदल करा' या चौथे सदरांत सँडहर्स्ट ब्रिज या लाइनींतील ३२ नंबराखालीं कापलेला भाग आढळून येईल. यावरून राउंड टेंपल येथें गाडी बदल करावी लागेल हें सिद्ध झालें. नंतर येथून जर आपण बेलार्ड पिअरला जाणाऱ्या ट्रामवेंत बसला "तर आपणांस पुनः या गाडींतील कंडक्टर सँडहर्स्ट ब्रिज या लाईनींतील ९ नंबरचा खालील भाग कापून देईल यावरून प्रिन्सेस डॉक येथें पुनः ही गाडी बदल करावी लागेल. नंतर येथून बदल केलेली गाडी आपणास थेट टांकबंदरला घेऊन जाईल.

### इन्स्पेक्टर

या पांचव्या सदरांवरून इस्पेक्टरानें कापलेल्या नंबरचे स्टेशनावर तिकीट तपासलें हें सिद्ध होतें.

**सूचना**—उतारूनें ट्रामगाडीच्या लहान तिकीटावरून गाडी बदल करावी लागत नाहीं व मोठ्या तिकीटावरून गाडी बदल करावी लागते. सबब 'बदल करा' हें तिकीट मिळतांच गाडी कोठें बदल करावी लागेल ह्याकडे उतारूनें जरूर लक्ष पुरवावें.

## शहराचे मुख्यभाग व त्यांचे पोटविभाग.

येथील म्युनिसिपालिटीनें कामाचे सोयीसाठीं या शहराचे एकंदर ७ भाग करून त्यांना अनुक्रमें ए, बी., सी, डी, इ, एफ्, जी वार्ड ( भाग ) अशीं इंग्रजी अक्षरांचीं नांवें दिलीं आहेत. शिवाय या सात भागांचे पुनः ३९ पोटविभाग केले आहेत.

### ए वार्ड ( कोट. )

**पोटविभाग** ( ५ ):—अप्पर कुलाबा, लोअर कुलाबा, उत्तरकोट, दक्षिणकोट व मैदान.

**प्रेक्षणीय स्थळें व सारांशः—प्रांग्ज लाईट हाऊसः**—हा दिवा कुलाब्यास समुद्रांत एका खडकावर असून तो रात्रीं सतत फिरत असतो. ह्या दिव्याचा दर्यावर्दी लोकांना फारच उपयोग होतो. दुसरें ह्या दिव्याच्या योगें बोटी व जहाजें यांना बंदरांत सुरक्षितपणें शिरतां येतें. **वेधशाळाः**—ही शाळा कुलाब्याचे अगदीं शेवटचे टोंकास आहे. ह्या शाळेंत पर्जन्य मान, भूकंप, वादळ केव्हां होणार, ताऱ्यांच्या गति, घड्याळाची नक्की वेळ वगैरें माहिती उत्तम प्रकारें समजते. **सासून डॉक**—ही गोदी कुलाब्यास ट्राम टर्मिनस नजीक असून, ह्या गोदींतून रोज लाखों खंडीचा माल शहरांत येतो व बाहेरगांवीं रवाना होतो. **ॲपोलो बंदर**—हवा खाण्याचें उत्तम ठिकाण असून येथून समुद्राचा देखावा फारच मनोहर दिसतो. **ताजमहाल हॉटेल**—हें हॉटेल ॲपोलो बंदरानजीक असून, येथें राजे, सरदार, जहागिरदार वगैरे बडेलोक उतरत असतात. सबंध मुंबईत ह्या इमारतीसारखी भव्य व टोलेजंग इमारत कोणतीच नाहीं. **प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियम**—हा पदार्थ संग्रहालय सातवे एडवर्ड महाराज यांच्या पुतळ्यानजीक असून ह्यांत कलाकौशल्य, प्राचीन व पुरातन वस्तु, प्राणीशास्त्र, व वनरक्षणशास्त्र वगैरे प्रेक्षणीय वस्तूंचा भरपूर संग्रह केलेला आहे.

**सातवे एडवर्ड महाराजांचा पुतळा**—हा पुतळा पंचधातूंचा बनविलेला असून एका उमद्या घोड्यावर बसविलेला आहे. ह्या पुतळ्यास सवा लाख रुपये खर्च आलेला आहे. **न्यू सेक्रेटरिएट ऑफिस**—रॅाटन रो व बॅकवे ह्या दोन रस्त्यावर हें ऑफिस असून येथें **गव्हरनर साहेब** यांचें विराजमान होण्याचें स्थान आहे. **राजाबाई टॅावर**—हा टॉवर सबंध मुंबईत उंच असल्यामुळें येथून मुंबापुरीचा व समुद्राचा देखावा अतिशय उत्तम दिसतो. **युनिव्हरसिटी सिनेट हॉल** ह्या इमारतीचें काम फ्रेंच लोकांच्या बांधणीच्या धर्तीवर बांधलेलें असून येथें प्रतिवर्षी निरनिराळ्या परिक्षेंत उत्तीर्ण झालेल्या उमेदवारांस 'चान्सलर' ही पदवी देण्यांत येते. **हायकोर्ट**—ही इमारत दगडी बांधलेली असून भव्य व टोलेजंग आहे. ह्या इमारतीचे दुसरे मजल्यावर एकंदर सहा न्यायकोर्टें आहेत. हें कोर्ट पाहण्याची सर्वांना मोकळीक आहे. **सर रिचर्ड टेंपल**—हा पुतळा माजी प्रसिद्ध गव्हरनर साहेबांचा असून, तो चर्चगेट स्टेशनानजीक एक्स्प्लेनेड रोडवर आहे. **व्हिक्टोरिया राणीचा पुतळा**—हा पुतळा एक्स्प्लेनेडरोडवरच असून, हा पुतळा बघणारास सर्व राजकीय चिन्हें पहावयास सांपडतात. **मार्किस कार्नवालीस व मार्किस वेलस्ली** हे पुतळे टाऊन हॉलासमोर एल्फिन्स्टन सर्कल नांवाचे बागेंत असून, मार्किस वेलस्ली यांच्या पुतळ्याच्या चौथऱ्याचे पायथ्याशीं मुंबईतील धनिक व्यापाऱ्यांचे पुतळे व आसईचे लढाईचा देखावा दाखविला आहे. **टॉऊन हॉल**—हा हॉल एल्फिन्स्टन सर्कलच्या पूर्वेस असून ह्याचा सार्वजनिककामाकडे विशेष उपयोग होतो.

**गव्हरमेंन्ट डॉकयार्ड फॅक्टरी**—हा कारखाना—टाऊन हॉलापासून अगदीं नजीक असून, येथील वाफेनें चालणाऱ्या हातोड्याचें काम अत्यंत प्रेक्षणीय आहे. **टांकसाळ**—ही इमारत मिंटरोडचे टोंकास आहे. येथें चांदी, सोनें व तांबें ह्या धातूंचीं सर्व प्रकारचीं नाणीं पाडतात.

**रॉयल एशियाटिक सोसायटीची लायब्ररी व पदार्थसंग्रहालय**–लायब्ररींत सुमारें एक लाख पुस्तकें असून हिची वार्षिक वर्गणी ५० रुपये आहे. पदार्थसंग्रहालयांत जुन्या मूर्ति, शिलालेख व शिल्पकामाचे नमुने वगैरे पदार्थ प्रेक्षणीय आहेत. **जनरल पोष्ट ऑफिस**–हें हेड पोस्ट ऑफिस बोरीबंदरनजीक फोर्ट स्ट्रीटचे नाक्यावर आहे. इमारतीचें बांधकाम दगडी केलेलें असून, ही इमारत बरीच मोठी आहे. **बोरीबंदर**–जी. आय्. पी. रेल्वेचें सर्वांत मोठें हेंच स्टेशन होय ह्या स्टेशनांतील इमारतीचे तिन्ही मजल्यावर रेल्वे ऑफिसें आहेत. **म्युनिसिपल ऑफिस**–बोरीबंदर स्टेशनाचे समोरच हें ऑफिस असून, ही इमारत मोठी भव्य आहे **कॉमाहॉस्पिटल**–हें हॉस्पिटल क्रुकशांक रोडवर म्युनिसिपालिटी ऑफिस नजीक आहे. येथें फक्त स्त्रिया व मुलें ह्यांना धर्मार्थ औषधोपचार करितात. **क्राफर्ड मार्केट**–सदर्हु मार्केट अबदुल रहिमान स्ट्रीटचे टोंकास असून सिताराम बिल्डिंग शेजारींच आहे. ह्या मार्केटांत सर्वोत्तम असे फळफळावळ, भाजीपाला, किराणामाल, हार, तुरे, फुलें वगैरे सर्व प्रकारचा माल मिळतो.

## बी वार्ड ( मांडवी )

**पोटविभाग**-मांडवी, चकला, उमरखाडी व डोंगरी.

**प्रेक्षणीय स्थळें व सारांश**—**प्रिन्सेस डॉक**–सर्व आशिया खंडांत ह्या गोदीएवढी मोठी गोदी नाहीं. ह्या गोदींत यारी नांवाचीं यंत्रें, फ्लाइंग ब्रिज, जहाजें, आगबोटी वगैरे पहावयास सांपडतें. **व्हिक्टोरिया डॉक**–ही गोदी प्रिन्सेस डॉकचे शेजारींच आहे. **अलेक्झांड्रा** कोकणपट्टी, गोवें, धरमतर, उलवा वगैरेकडे जाणाऱ्या बोटी ह्या गोदीच्या बाहेरील धक्क्यावरून सुटतात.तसेंच परदेशीं जाणाऱ्या बोटी आंतील धक्क्यावरून सुटतात. **वाडी बंदर**–हें जी. आय्. पी. रेल्वेचा सर्व प्रकारचा माल चढविण्याचें व उतरविण्याचें मुख्य ठिकाण आहे. **कॅरनॉक बंदर**–बी. बी. सी. आय्. रेल्वेचा सर्व

प्रकारचा माल चढविण्याचें व उतरविण्याचें मुख्य ठिकाण आहे. **उमर खाडी तुरुंग**—ह्या तुरुगास चौबाजूंनीं भक्कम व उंच अशा भिंती बांधलेल्या असून, आंत तुरुंगास योग्य अशा सर्व सोयी आहेत. **मोंगल मशिद**—तुरुंगाचे रस्त्यावर बाबुला तलावाजवळ असून हिचें मुख्य दरवाज्यावरील नकशी काम अत्यंत चित्तवेधक आहे. **सात ताड मशिद**—ही मशिद मशीद बंदराजवळ आहे.

## सी वार्ड ( भुलेश्वर )

**पोटविभाग**—(६) भुलेश्वर, धोबी तलाव, मार्केट, खारातलाव, फणसवाडी व कुंभारवाडा.

**प्रेक्षणीय स्थळें व सारांश—मुंबादेवी, पारसनाथाचा डेरा, स्वामी नारायण मंदिर, भुलेश्वर, पंचमुखी हनुमान, लक्ष्मीनारायण मंदिर, कृष्णबाग, सुंदरबाग, कालबादेवी** वगैरे देवस्थानें एकवेळ अवश्य पाहण्यासारखीं आहेत. **भुलेश्वर मार्केट**—ह्या मार्केटांत उच्च वर्णाचे लोकांची विशेष गर्दी असते हें मार्केट लहानसेंच पण टमदार असून येथें भाजीपाला व फळफळावळ फार उत्तम प्रकारचें मिळतें. **नळबाजार मार्केट**—ह्या मार्केटांत भाजीपाल्याचा खप सर्व मार्केटांपेक्षां विशेष आहे. **चोरबाजार**—हा बाजार नळबाजार मार्केटाचे शेजारीं असून येथें सर्व तऱ्हेचे नाना प्रकारचे जुने पदार्थ विकले जातात ह्या बाजारांत वेळेवर कांहीं वस्तु फारच स्वस्त किंमतीस मिळत असतात. **मंगळदास मार्केट, मुळजी जेठा मार्केट, लखमीदास खिमजी मार्केट,** व **मुरारजी गोकुळदास मार्केट**मध्यें व्यापारी लोक कापड खरेदी करीत असतात.

## डी वार्ड ( गिरगांव )

**पोट विभाग ( ५ )**-गिरगांव, खेतवाडी, चौपाटी, वालकेश्वर, व महालक्ष्मी.

**प्रेक्षणीय स्थळें व सारांश—झावबाचे वाडींतील राम मंदिर**— ह्या मंदिरांतील मूर्ति सुमारें ३॥ फूट उंचीच्या असून प्रेक्षणीय आहेत. **चौपाटी**—हें एक हवा खाण्याचें उत्तम ठिकाण आहे. येथें सायंकाळीं ५ वाजल्यापासून रात्रींचे १० वाजेपर्यंत लोकांची विशेष गर्दी असते. **बाबुलनाथ**—हें देवालय चौपाटी नजीक असून, येथून मुंबईचा व समुद्राचा देखावा फारच उत्तम दिसतो. **सर फिरोजशहा मेथा गार्डन ( हॅंगींग गार्डन )**—हा बाग बाबुलनाथाचे देवालयानजीक एका उंच टेकडीवर हवा खाण्याकरितां मुद्दाम तयार केलेला आहे. ह्या बागेच्या खालीं एक मोठा रिझरव्हायर ( तलाव ) बांधलेला आहे. ह्याच रिझरव्हायर मधून मुंबईच्या सर्व लोकांना पिण्याचें पाणी पुरवलें जातें. **वाळकेश्वर**—हें देवालय वाळकेश्वराचे. डोंगरावर असून येथें एक शिवलिंग आहे. येथें वर्षांतून दोनदां यात्रा भरत असते. **महालक्ष्मी**—हें देवालय ताडदेव पासून सुमारें एक मैलावर वार्डनरोड नजीक समुद्राचे अगदीं काठीं आहे. ह्या देवालयांत **महालक्ष्मी, महाकाली व महासरस्वती**, अशा तीन मूर्ति आहेत. येथें नवरात्रांत मोठी यात्रा भरत असते. **गव्हरनर साहेबांचा बंगला**—हा बंगला वाळकेश्वरचे शेवटचे टोंकास आहे.

## ई वार्ड ( भायखळा. )

**पोट विभाग**—(७) भायखळा, माजगांव, ताडवाडी, नवा नागपाडा, जुना नागपाडा, कामाठीपुरा व ताडदेव.

**प्रेक्षणीय स्थळें व सारांश—आल्बर्ट मुझियम व राणीचा बाग**—आल्बर्ट म्युझियममध्यें मृत पशु, पक्षी यांचे देखावे व कामगिरी केलेले उत्तमोत्तम पदार्थ यांचा संग्रह केलेला आहे. तसेंच बागेंत जगांतील पशु, पक्षी व निरनिराळया वनस्पति पहाण्यासारख्या आहेत. **भायखळा मार्केट**—हें मार्केट भायखळा स्टेशनानजीक असून तें रात्रीचे चार पासून सकाळीं सातआठ वाजेपर्यंत उघडें असतें. येथें बाहेरगांवांहून

भाजीपाला, फळफळावळ वगैरे माल येतो. येथें सर्व घाऊक माल विकला जातो. किरकोळ माल कोणताच विकला जात नाहीं. **जे. जे. हास्पिटल** हें हॉस्पिटल मुंबईंत सर्वांत मोठें असून, येथें रोग्यांना फुकट औषधोपचार करण्यांत येतो.

## एफ वार्ड ( परेल )

**पोटविभाग ( ८ )** चिंचपोकळी, परेल, शिवडी, नायगांव; दादर, माटुंगा, धारावी व शींव.

**प्रेक्षणीय स्थळें व सारांशः—कॉटनग्रीन मार्केट**—सदर्हु मार्केट पूर्वी कुलाब्यास होतें. हल्लीं तें शिवडीस टांकबंदर नजीक नवीन बांधविण्यांत आलें आहे. येथें न्यू आर्लियन्स शहराप्रमाणें कापसाच्या व्यापाराची मोठी घडामोड होत असते. **विठोबाचें देवालय**—सदर्हु देवालय माटुंगा येथें आहे. आषाढ शुद्ध एकादशीस येथें मोठी जत्रा भरत असते. **प्रयोगशाळा परेल**—ह्या शाळेंत सर्पाचे दंशावर औषधी उपाय शोधून काढण्यासाठीं जें सर्पाचें विष लागत असतें तें विष काढण्याची कृति अत्यंत चमत्कारिक आहे. परळ भागांत **गिरण्या** व **मिठागरें** पुष्कळ आहेत.

## जी ( वार्ड माहीम )

**पोटविभाग ( ४ )** मिंगुटमंडळी, माहीम, वरळी व मनमाळा.

**प्रेक्षणीय स्थळें व सारांश—माहिमचा उरूस**—हा उरूस माहीम येथें वर्षांतून एकदां भरत असतो व तो सतत आठ दिवस राहतो. **मामाहजानी**—वरळीचे बांधाचे शेवटीं पश्चिमेस हें एक मुसलमान लोकांचें प्रसिद्ध ठिकाण आहे.

---

## मुंबईतील ठकबाजीचे कांहीं प्रकार.

**मुंबईतील ठकबाजी**—मुंबईत सज्जन लोकांचा जसा विशेष भरणा आहे तसाच भामटे, भोंदू, लबाड, ठग, व जुगारी वगैरे बदमाष लोकांचाही बराच भरणा आहे. हे लोक मार्गानें येणाऱ्या जाणाऱ्या लोकांवर कोणतेवेळीं कसा प्रसंग आणतील, ह्याचा मुळींच नेम नसतो. कित्येक खिसे कातरतात; कित्येक बैद्यांचें सोंग घेतात; कित्येक नानातऱ्हेचीं सोंगें घेऊन पैसे उपटतात; कित्येक लहान मुलांच्या अंगावरील दागिने काढतात. अशी अनेक प्रकारचीं सोंगें घेऊन हे गरीब व भोळसर लोकांना कसे ठकवितात ह्याचें वर्णन करणें महा कठीण आहे, हे लोक आपला दुष्ट हेतु सिद्धीस नेण्यासाठीं कशा युक्त्या योजितात व बोलबोलतां लोकांच्या डोळ्यांत कशी धूळ टाकितात ह्याची थोडक्यांत माहिती करून देणें इष्ट आहे. कारण ह्या शहरांत नित्य हजारों अपरिचित असे पुष्कळ लोक येत असतात. त्यांना ही माहिती असल्यास ते सावधगिरीनें वागतील हें जाणून, ठकबाजीविषयीं दोनतीन उदाहरणें खालीं दिलीं आहेत. तीं मुंबईस येणाऱ्या प्रत्येक मनुष्यानें अवश्य वाचावीं.

**१ रिंग ड्रापर्स** ( आंगठी फेकणारे ) म्हणून जे लोक असतात ते रस्त्यानें चालत असतां एकाद्या पितळी आंगठीस साधारण सोन्याचा मुलामा चढवून ती एकाद्या भोळसर मनुष्यापुढें त्यास नकळत मोठ्या शिताफीनें टाकतात. नंतर तो भोळसर मनुष्य एक दोन पावलें पुढें जातांच त्याचे दृष्टीस ती आंगठी पडते. त्यानें ती उचलून घेतांच तो ठग मनुष्य पुढें येऊन म्हणतो कीं, आपणास काय सांपडलें हो ! आपण ही वस्तु घेतांना दुसऱ्या मनुष्यानें आपणास पाहिलें असें समजून तो भीत भीत ती वस्तु त्यास दाखवितो. त्यानें ती वस्तु पाहण्यास हातीं घेतांच तो त्या मनुष्यास पुनः म्हणतो कीं, आपणा उभयतांस ही वस्तु सांपडली असल्यामुळें, हिचा अर्धा भाग मला मिळावा. अर्धा भाग देण्यास

तो कांकूं करूं लागल्यास, त्यास थोडीशी पोलिसाची भीति घालतो म्हणजे मग तो सहज कबूल होतो. मग आपसांत त्या वस्तूची किंमत ठरवून, ठरलेल्या किंमतीपैकीं निम्मी रक्कम त्या मनुष्यास देतो. रक्कम हातांत पडतांच तो ठग मनुष्य तेथून निघून जातो. इकडे वस्तु घेणारा इसम मोठ्या आशेनें भराभर पावलें टाकीत घरीं निघून येतो व परीक्षा करून पाहतो तों पितळ दृष्टीस पडतें. पितळ दृष्टीस पडतांच कपाळावर हात मारून घेतो. अशा रितीनें कांहीं लोक फसतात.

**भोंदू वैद्य**—ह्या शहरांत ह्या लोकांचा विशेष सुकाळ आहे. हे वैद्य बहुतेक मुसलमान असून नेहमीं रस्त्यांतून फिरत असतात. व एकादा मनलायक मनुष्य दृष्टीस पडला कीं, कोणत्यातरी निमित्तानें त्याच्याशीं बोलण्यास सुरुवात करितात. व त्या वैद्याबरोबर तो परका मनुष्य बोलूं लागला म्हणजे मध्येंच मोठ्या आश्चर्यानें त्यास क्यौंजी, आपका आवाज तो बहोत बैठ गया है; आपको बहोत जबर बिमारी पैदा हुई है, अशा तऱ्हेचे वेळ पाहून कित्येक प्रश्न करूं लागतो व त्याचेविषयीं बरीचशी कळकळही दाखवूं लागतो. मग साहजिकच तो बिचारा त्यास आपली सर्व हकीगत सांगण्यास आरंभ करितो. ह्याप्रमाणें तो इसम बराचसा वश झालेला पाहून, त्यास तो भोंदू वैद्य मधून मधून वयाच्या मानानें एक दोन अंतस्थ गोष्टी सांगूं लागतो त्या ऐकतांच त्यास असें वाटतें कीं, हा कोणी तरी चांगलाच हकीम असावा. कारण ह्याची व आपली पूर्वीं कधींही ओ-ळख नसतां ह्यानें केवळ आपल्या शब्दावरून आपल्या रोगाची परीक्षा केली अशा तऱ्हेनें तो इसम ह्या भोंदू वैद्याची लबाडी न समजतां, औषधाकरितां त्याचे मागें लागतो. प्रथम तो भोंदू वैद्य उडवाउडवीच्या गोष्टी सांगून अगदीं निरपेक्ष बुद्धि दाखवितो. व असें झालें म्हणजे त्या इसमाचा ह्या भोंदू वैद्यावर पूर्ण विश्वास बसतो. नंतर तो भोंदू वैद्यही फारसे आढेवेढे न घेतां त्यास एका गांधीच्या दुकानीं घेऊन जातो. तेथें गेल्यावर कांहीं तरी पांच दहा युनानी औषधांचीं नांवें सांगून दहा बारा आण्याच्या जिनसा त्या इसमास देववितो व त्यांबद्दल दुकानदार त्याचेपासून पांच सहा रुपये

चोपून घेतो. तो इसम निघून जातांच ह्या मिळकतींतील बराचसा भाग भोंदू वैद्यास मिळतो हें आपण विसरतां नये.

**जुगारी ठग**—मुंबईत कित्येक ठगलोक जुगार फार खेळत असतात; त्यांपैकीं कित्येक पत्त्यानें जुगार खेळतात. कित्येक पैशानें खेळतात. कित्येक फांशानें खेळतात; कित्येक चामड्याचे वादीनें खेळतात. असलें जुगार खेळणारांची पांच सहा इसम मिळून एक टोळी असते. येथें विशेष लक्षांत हें असूं द्यावें कीं, ह्या टोळींतील प्रत्येक इसम निरनिराळ्या जातीचा असल्यामुळें, हे साथीदार असावे ह्याविषयीं इतरांस मुळींच कल्पना येत नाहीं. पुढें त्या टोळीपैकीं एक इसम प्रथम आपल्या जवळ कांहीं नाणें घेऊन प्रसिद्ध व विशेष रहदारीच्या रस्त्यावर येऊन बसतो. तेथें बसल्यावर पहिल्यानें पोलीस वगैरे नाहीं असें पाहून अत्यंत सावधगिरीनें तो इसम आपल्या साथीदारांसह खेळास प्रारंभ करितो. व खेळतां खेळतां उगीच मोठ्यानें 'हरला, हरला; जिंकला, जिकला' अशा आरोळ्या मारतात. असा प्रकार कांहीं वेळ चालतांच ती आरडाओरड ऐकून, येथें काय चाललें आहे तें पाहण्यासाठीं रस्त्यावरून जाणारीं येणारी मंडळी सहज जमूं लागते. 'आधींच उल्हास तशांत फाल्गुन मास' ह्या ह्मणीप्रमाणें मुंबईचे विचित्र रहिवासी कोणी एकाद्या वस्तुकडे सहज पाहूं लागला ह्मणजे 'काय आहे ? काय आहे ? ह्मणून विचारीत सुटतात. व तेथें सहज पांच पन्नास मनुष्यें जमतात; परंतु काय आहे व काय नाहीं, ह्याचा कोणासच पत्ता नसतो. अशा तऱ्हेनें बराचसा जनसमुदाय जमतांच त्या साथीदारांपैकीं एकामागून एक असे डाव मांडून खेळत असतात. ह्यां पैकीं कांहीं जिंकतात व कांहीं मुद्दाम हरतात. ह्याप्रमाणें भोंवतीं जमलेला जनसमुदाय आशाबद्ध होऊन आपणही जिंकूं ह्या आशेनें पैसे लावूं लागतात. पण त्यांच्या हातचलाखीमुळें कोणीही जिंकू शकत नाहीं. मात्र विनाकारण खिशांतील पैसे गमावून डोकें खाजवीत निघून जातात. ह्याप्रमाणें अनेक लोक नानाप्रकारचीं सोंगें ढोंगें करून लोकांपासून पैसा लुबाडतात. करितां अशा धूर्त लोकांपासून इतर लोकांनीं सावध राहण्याचा शक्य तितका प्रयत्न करावा.

---

# प्रसिद्ध व प्रेक्षणीय देवालयें.

## मुंबादेवी.

( १ ) ह्या देवीचें देवालय मोती बाजारांत आहे. ह्या देवालयाची हद्द मारवाडी बाजाराचे एका टोंकापासून दुसरे टोंकापर्यंत असून ह्या देवालयास एकंदर तीन दरवाजे आहेत. त्यांपैकीं मुख्य दरवाजा मोती-बाजारांतून चिंचबंदराकडे जाणाऱ्या रस्त्याचे बाजूस आहे. दुसरा दर-वाजा मारवाडी बाजाराकडून आहे. व तिसरा दरवाजा पायधुनीकडून काळबादेवी रोडला जाणाऱ्या सडकेवर कंसारा चाळीचे बाजूनें आहे. हें देवालय टुमदार बांधलेलें असून त्याचे पुढें एक लहानसा सुंदर सभामंडप आहे. देवालयाचे गाभाऱ्यांत जाण्यायेण्याचा जो मुख्य दरवाजा आहे, त्या दरवाज्यावर देवादिकांचीं चित्रें कोरलेलीं असून वर चांदीचा पत्रा चढविला आहे. आंत मोरावर आरूढ झालेली मुंबादेवीची मूर्ति स्थापन केलेली आहे. देवीच्या पुढें सभामंडपांत एक पितळेचा सिंह बसविलेला आहे.

ह्या देवालयास श्रीमान लोकांचा आश्रय असल्यामुळें देवीची पूजा अर्चा मोठ्या थाटानें होत असते. उत्सवाचे वेळीं व विशेष प्रसंगीं देवीच्या अंगावर अति मौल्यवान् दागदागिने चढवीत असतात ह्या देवा-देवालयांत नवरात्रांत एक मोठा होम करीत असतात. त्यावेळीं कित्येक धार्मिक लोक बराच दानधर्म करून मणोगणती तूप यज्ञनारायणार्पण करितात. ह्या नऊ दिवसांत येथें देवीचे दर्शनार्थ नित्य हजारों भक्तजन येतात.

देवीचे देवालयाशेजारीं गणपती, मारुती, भोळानाथ व इंद्रायणी ह्या देवतांचीं देवालयें असून, देवीचे समोरील मंदिरांत मुरलीधर, राम, लक्ष्मण, सीता वगैरे देवतांच्या मूर्ति स्थापन केलेल्या आहेत. मुंबादेवीचे

देवालयाचे डावे बाजूस एक तलाव आहे. ह्या तलावास ‘ मुंबादेवीचा तलाव’ असें म्हतणात. ह्या तलावास चोहोंबाजूंनीं दगडी फरसबंदी चौथरे बसविलेले असून दगडी पायऱ्या बांधून काढलेल्या आहेत. तळयाचे मध्यभागीं एक लांकडी स्तंभ उभा केलेला आहे- ह्या तळयांतील पाणी अगदीं हिरवट आहे. तलावाचे समोर गणपती, लक्ष्मीनारायण, मारुती व पंचमुखी महादेव ह्यांचीं देवालयें आहेत. ह्या देवालयांचे मागील बाजूस एका कोंपऱ्यांत शमीचा एक मोठा वृक्ष आहे. विजयादशमीचे दिवशीं ह्या वृक्षाची लोक पुजा करीत असतात.

## पारसनाथाचा डेरा.

( २ ) मारवाडी व श्रावक वाणी वगैरे लोकांच्या देवालयास ‘ डेरा ’ असें म्हणतात. हा डेरा नेहमीं उघडा असतो. हा डेरा बांधण्याची तऱ्हा आपल्या देवालयापेक्षां अगदीं निराळी असते. देवालयाच्या मुख्य दरवाज्यावर पारसनाथाची मूर्ति कोरलेली असते. डेऱ्यांत प्रथमारंभीं शिरतांबरोबर एके बाजूस त्यांचे जती बसण्याच्या जागा केलेल्या असतात. तेथें त्यांचे जवळ मयूरपिच्छांचा कुंचा असतो. हे जति आपले मुखांत क्षुद्र प्राण्यांचा प्रवेश होऊं नये म्हणून ते नेहमीं आपल्या मुखावर वस्त्राची एक लहानशी पट्टी बांधतात. तसेंच चालतांना देखील सूक्ष्म प्राण्यांची हिंसा घडूं नये म्हणून फार बारीक रितीनें निरीक्षण करून पुढें पाऊल टाकीत असतात. ‘ अहिंसा परमो धर्मः ’ हें त्याच्यां धर्माचें मुख्य तत्त्व आहे. ह्या लोकांचे डेऱ्यांचे तक्त पोशीस, भिंतीस व दरवाज्यास असे अनेक ठिकाणीं आरसे बसवून त्यांत पारसनाथ व इतर मूर्तींचीं चित्रें बसविलेलीं असतात. मुंबईत असलेल्या ह्यांच्या डेऱ्यांपैकीं पायधुनीवर असलेला डेरा सर्वांत मोठा असून तो अगदीं पाहण्यालायक आहे.

पायधुनीवरील डेऱ्यांतील मुख्य पारसनाथाची मूर्ति पहिल्या मजल्यावर आहे. मुख्य दरवाज्यांतून आंत शिरतांच वर जाण्यास एक जिना

दृष्टीस पडतो. हा जिना चढून गेलें म्हणजे प्रथम दर्शनींच लांब व रुंद अशा सहाणी दृष्टीस पडतात. त्यांचे मानानेंच चंदनाची खोडेंही मोठीं असतात. पारसनाथाचे मूर्तिसमोर नेहमीं अगरबत्त्यांचा धूप चालू असतो. ह्या मूर्तीस ' घोरजीनाथ ' असें म्हणतात. घोरजीनाथास कधीं कधीं जडावाचा, मौल्यवान मखमलीचा, किनखापादि जरीचा वगैरे अनेक तऱ्हेचा पोषाख चढवीत असतात. ह्या पोषाखावर हिरे, माणकें व पांचू बसविलेलीं असतात; त्यामुळें दिव्याच्या प्रकाशांत तीं फारच चमकतात.

ह्या घोरजी नाथाची ' आंगी ' दीड दोन लाखांची आहे असें म्हणतात. आंगी म्हणजे मूर्तीवर पोषाख चढविणें हें होय. ही आंगी चढविण्याची गंमत पहाण्याची संधि श्रावण महिन्यांत मारवाडी लोकांचे पजुसण येतात, त्यावेळीं असते. ह्या सणाचे दिवशीं हे लोक डेऱ्यांत मोठी रोषनाई करितात. आंगीं चढविण्याचे प्रसंगीं प्रथम पुजारी उभा राहून म्हणतो कीं, ' पन्ना शेठनी आंगी बे मण ' इतक्यांत दुसरा इसम म्हणतो कीं, ' मारी चार मण ' तिसरा म्हणतो ' मारी आठ मण ' ह्याप्रमाणें वाढत वाढत जाऊन अखेर पंचवीस तीस मणापर्यंत जाते. कधीं कधीं तर ह्यांही पेक्षां जास्त जात असते. ज्या इसमाची आंगीं सर्वांत जास्त मणांची असेल त्याचेच नांवाची आंगीं त्या दिवशीं मूर्तीवर चढावितात. ह्या आंगीं बद्दल रुपये घेण्याची रीत अशी आहे कीं, ज्यांचे ज्यांचे नांवांचीं आंगी जितक्या जितक्या मणांची चढली असेल तितके मण तुपाचे रुपये प्रत्येकापासून घेत असतात. मात्र एवढेंच कीं, तुपाचा वाटेल तो भाव जरी असला तरी दरमणास अडीच रुपयेच सर्वांकडून घ्यावयाचें नक्की ठरलेलें असतें. मारवाडी व श्रावक वाणी श्रावण महिन्यांत उपोषणें करीत असतात. हीं उपोषणें कित्येक श्रीमंत लोक त्यांना त्याबद्दल रुपये देऊन विकत घेत असतात.

हे लोक धार्मिक असल्यामुळें ह्यांचा पैसा धर्मांचे बाबतींत विशेष खर्च होत असतो.

## स्वामी नारायण मंदिर.

( ३ ) हें मंदिर गुलालवाडी नजीक तिसरे भोईवाड्याचे गल्लींत अगदीं नाक्यावरच आहे. हें देऊळ नुकतेंच म्हणजे समारें २० वर्षांपूर्वी बांधविण्यांत आलें आहे. पूर्वी ह्याच जागेवर एक लहानसें देऊळ सुमारें ७५।८० वर्षांपूर्वी बांधलेलें होतें व त्यांत **स्वामी नारायण** व **गौलोकविहारी** ह्यांच्या मूर्ति स्थापन केलेल्या होत्या असें म्हणतात.

ह्या नवीन देवळाचें बांधकाम दगडी केलेलें असून तें फारच सुंदर व प्रेक्षणीय असें केलेलें आहे. ह्या देवळाचा मुख्य दरवाजा लाकडी असून तो अत्यंत उंच, भव्य व मजबूत असा केलेला आहे. ह्या दरवाज्याचे मुखाजवळ एक भय्या नेहमीं बसलेला असतो. ह्या दरवाज्याजवळ भक्तजनांस पादत्राण काढून ठेवण्यासाठीं जागा केलेली असून डावे बाजूस गोशाळा आहे. दरवाज्यासमोर ज्या पायऱ्या आहेत त्या चढून वर गेलें असतां, उजवे हातास एका लहानशा देवालयांत गजाननाची सुंदर मूर्ति व एक शिवलिंग स्थापन केलेलें दृष्टीस पडतें; तसेंच डावे हातास हनुमानजीची रम्य मूर्ति स्थापन केलेली दृष्टीस पडते; नंतर समोर मुख्य देवालयांतील गाभाऱ्यांत **स्वामीनाराण** व **लक्ष्मीनारायण** यांच्या सुंदर मूर्ति नजरेस पडतात. ह्या मूर्ति संवत १९५९ मध्यें वैशाख शु॥ एकादशीस मोठ्या समारंभानें स्थापन करण्यांत आल्या आहेत. ह्या मूर्ति शुभ्र स्फटिकांच्या घडलेल्या असून त्यांना एका फरसबंदी चौथऱ्यावर उभ्या केलेल्या आहेत. ह्या मूर्ति सुमारें ३॥ फूट उंचीच्या आहेत. ह्या मूर्तिचे उजवे बाजूस जुन्या देवालयांतील स्वामी नारायण व गौलोकविहारी यांच्या मूर्ति स्थापन केलेल्या असून, डावे बाजूस सुखसज्जा-

यांची मूर्ति स्थापन केलेली आहे. ह्या मूर्तींचे पोषाख दररोजचे निरनिराळे असून त्यांचे अंगावर सोन्याचे, मोत्यांचे व हिऱ्यांचे बनाविलेले दागिने चढवीत असतात. पूजादिकांचा थाट फार उत्तम असून दर्शनाच्या वेळाही ठराविक आहेत.

ह्या देवालयांतील सभामंडप बराच विस्तीर्ण असून त्यास साधारण घुमटाचा आकार देऊन आंत सुंदर पुतळे कोरलेले आहेत. ह्या सभामंडपाची फरसबंदी **ठा. जेठाभाई दामजी व भाई करसनदास मोरारजी** ह्यांचे मोक्षार्थ **ठा. करमसी दामजी** यांनीं करविली आहे. ह्या फरसबंदीचें काम चित्रविचित्र रंगाच्या संगमवरी दगडांचे केलेलें असल्यामुळें जणुं काय चित्रविचित्र रंगाचे गालिचेच पसरलेलें आहेत कीं काय असा प्रेक्षकांस भास होतो. देवळाच्या घुमटाचें कामहि कोरींव केलेलें असून त्यावर सुवर्णकळस बसविलेले आहेत. एकंदरींत हें देऊळ एकवेळ अवश्य पाहण्यालायक आहे ह्यांत मुळींच शंका नाहीं.

## भुलेश्वर.

( ४ ) हें देवालय भुलेश्वर मार्केट नजीक असून, तें दादाजी लक्ष्मणराव परभू नामक एका श्रीमंत गृहस्थानें बांधलेलें आहे. या देवालयांत शिरतांच पायरीवर उभे असलेले गुजराथी ब्राह्मण बेल व फुलें एका परडींत घेऊन तयार असलेले दृष्टीस पडतात. तें भक्तजनांस बेल व फुलें देऊन देवालयांत असलेल्या सर्व देवतांचें क्रमशः दर्शन करवितात. ह्या बद्दल देवतांचीं दर्शनें झाल्यावर भक्तजन त्यांना दक्षणा देतात. हें देऊळ मोठें असून गाभाऱ्याचे आंतील भागांत मध्यभागीं एक मोठें शिवलिंग स्थापन केलेलें आहे. ह्यासच भुलेश्वर असें म्हणतात. शिवलिंगाचे चौबाजूंस एक उत्तमसें नकशी काम केलेलें छत्र असून त्यावर रुपेरी पत्रा चढविलेला आहे. भुलेश्वराचे अंगावर पाण्याची धार सतत चालू असते.

देवालयाचे पुढें सभामंडपांत मुख्य दरवाज्यासमोर एक मोठा नंदी बसविलेला आहे. शिवाय शितळा देवीची मूर्ति स्थापन केलेली आहे. येथें भक्तजनांची सदोदित गर्दी असते. ह्या देवळांत सकाळीं व संध्याकाळीं आरतीचा जो थाट होतो तो कांहीं अलौकिकच म्हटला पाहिजे. आरतीचे प्रसंगीं भक्तजनांचीं अंतःकरणें इतकीं तल्लीन होऊन जातात कीं, कांहीं वेळ ते आपलें देहभानसुद्धां विसरून जातात.

ह्या देवालयाचे दक्षिण अंगास गणपतीचें देऊळ आहे. व त्याचे दुसरे बाजूस रामेश्वराचें देऊळ आहे. उत्तर अंगास बालाजीचें देऊळ असून त्याचेच दुसरे बाजूस बजरंगबलीचें देऊळ आहे. तसेंच भुलेश्वराचे देवालयासमोर दुसरा एक सभामंडप आहे, त्यांत कथा पुराणें वाचलीं जातात. ह्या सभामंडपाचे समोर एक वट व अश्वत्थ यांचा पार बांधलेला आहे. ह्या पारावर कांहीं देवतांच्या मूर्ति व कांहीं शिवलिंगें आहेत. ह्या सभामंडपाचे एके बाजूस एक विस्तीर्ण तळें असून त्याचे मध्यभागीं एक लांकडी खांब पुरलेला आहे. ह्याही तळ्यांतील पाणी स्वच्छ नसतें. ह्या तळयाचे कांठीं कांहीं बैरागी लोक सतत गांजा व भांग पिऊन नानातऱ्हेचीं सोंगें करून पडलेले असतात. भुलेश्वराचे देवळानिमित्त मुख्य दरवाज्यावर एक जागा तयार केलेली आहे तेथें एक चौघडा वक्तशीर बारमास झडत असतो. ह्या देवालयांत नेहमीं गाई बसलेल्या दृष्टीस पडतात. त्यांना वाणी, भाटे वगैरे भक्तजनांकडून धर्मार्थ चारा दिला जातो. देवालयाचे बाहेरचे अंगास फुलमाळ्यांचीं हार, तुरे, फुलें, गजरे इत्यादि विकण्याचीं बरींच दुकानें आहेत.

ह्या देवालयांत दर सोमवारीं व त्यांत मुख्यत्वेंकरून श्रावणी-सोमवार, महाशिवरात्र व प्रदोष ह्यादिवशीं भक्तजनांची इतकी गर्दी असते कीं, भुलेश्वराचें दर्शन घेण्यास मोठी मारामार पडते. शिवाय प्रत्येक श्रावणी सोमवारास येथें लोण्याचा निरनिराळा फारच सुंदर असा

देखावा करीत असतात. हा देखावा इतका प्रेक्षणीय असतो कीं. प्रत्यक्ष पाहिल्याखेरीज त्याची कल्पना होणें शक्य नाहीं.

## पंचमुखी हनुमान.

(५) हें देवालय भुलेश्वर या देवालयाचे मुख्य दरवाज्याचे समोरच असून, तें अगदीं जुन्या पद्धतीचें बांधलेलें आहे. ह्या हनुमानास एकंदर पांच मुखें आहेत म्हणून ह्यास 'पंचमुखी हनुमान' असें म्हणतात. पंचमुखी हनुमानाचे समोर शनिदेवाची मूर्ति स्थापन केलेली आहे. दक्षिण बाजूस महादेवाचीं निरनिराळीं लिंगें स्थापन केलेलीं आहेत. जेथें मोठें लिंग स्थापन केलेलें आहे तेथें निरंतर काळोख असतो. पश्चिम बाजूस विठ्ठल रखुमाई व राधाकृष्ण ह्यांच्या मूर्ति स्थापन केलेल्या असून तेथेंच रणछोडजींची मूर्ति आहे. ह्या देवालयांत, दर शनिवारीं व विशेष प्रसंगीं भयंकर गर्दी असते.

ह्या देवालयांत श्रावण महिन्यांत शुद्ध पौर्णिमे पावेतों केळीच्या खांबांचा पाळणा करीत असतात. ह्या पाळण्याचें नकशी काम दिवसें-दिवस अधिकाधिक अत्यंत प्रेक्षणीय असें केलें जातें. हें नकशी काम एक वेळ अवश्य प्रेक्षणीय असतें.

## श्री लक्ष्मी नारायण.

(६) हें देऊळ कावसजी पाटील यांचे तळ्याजवळ माधवबागेंत आहे. हल्लीं हें तळें बुजवून टाकण्यांत आलें आहे. लक्ष्मीनारायणाचें देऊळ लहानसेंच पण टुमदार बांधलेलें असून त्याचे सभोंवार धर्मशाळा बांधलेल्या आहेत. त्यांपैकीं उत्तरेकडील धर्मशाळा ही वास्तविक धर्म-शाळा नसून लहानसा टुमदार बंगला आहे. ह्या धर्मशाळा मोठ्या सुंदर असून बहुतकरून त्या सार्वजनिक कामाकरितां उपयोगी पडतात. हें देऊळ व सभोंवार असलेल्या धर्मशाळा मुंबई येथील कपोळ वाणी

**स्वर्गवासी शेठ माधवदास रणछोडदास यांचे चिरंजीव नरोत्तमदास** यांनीं आपल्या तीर्थरूपाचे स्मरणार्थ इ. स. १८७४ सालीं बांधविल्या आहेत.

श्री लक्ष्मीनारायणाचें देऊळ पूर्वाभिमख बांधलेलें असून त्याची रचना फारच उत्तम आहे. ठिकाठिकाणीं कोरींव काम केलेलें असून साधुसंतांचे व देवादिकांचे पुतळे घुमटाच्या खालील भागास कोरलेले आहेत. घुमटावर सुवर्णकळस असून तेथें नेहमीं निशाण फडकत असतें. देवळापुढें लहानसाच सभामंडप केलेला असून भुइतट फरसबंदी केलेला आहे. देवळाचे गाभाऱ्यांत जाण्यायेण्यासाठीं जो दरवाजा आहे त्याचें काम नकशीचें केलेलें असून त्यास वर रुपेरी पत्रा बसाविलेला आहे. श्री लक्ष्मीनारायणाच्या मूर्ति शुभ्र स्फटिकांच्या असून त्यांना एका फरसबंदी चौथऱ्यावर स्थापन केलेल्या आहेत. देवासमोर एक कारंजें असून त्यावर नेहमीं झांकण ठेवलेलें असतें. लक्ष्मीनारायणाच्या मूर्ति सुमारें तीन फूट उंचीच्या असून, नारायणाची मूर्ति तर जणूं काय भक्तजनांबरोबर हंसत आहे व लक्ष्मीची मूर्ति जणूं काय आपल्या सव्य हातानें भक्तजनांस घाबरूं नका, मी तुमचें रक्षण करीन ह्मणून आश्वासन देत आहे कीं काय असा भास उत्पन्न करण्यासारख्या ह्या मूर्ति आहेत. नारायणानें आपल्या प्रत्येक हातांत शंख, चक्र, गदा व पद्म अशीं आयुधें अनुक्रमें धारण केलीं आहेत व लक्ष्मीनें आपले डावे हातांत एक सुवर्णाचा पेला धारण केला आहे.

ह्या लक्ष्मीनारायणाचे मूर्तीस प्रतिदिवशीं निरनिराळा पोषाख चढाविण्यांत येत असतो. तसेंच अंगावर नेहमीं सोन्याचे, मोत्यांचे व हिऱ्यांचे दागिने चढवीत असतात. येथील पूजा त्रिकाळ होत असते. दर्शनाच्या वेळा नियमीत असल्यामुळें नियमीत वेळींच देवदर्शन होत असतें. ह्या देवाळयांत दर एकादशीस प्रेक्षणीय अशी तऱ्हेतऱ्हेची आरास करविण्यांत

येत असते. एकंदरींत पाहूं गेलें असतां ह्या मूर्तिसारख्या सुंदर मूर्ति क्वचित् ठिकाणींच पहावयास मिळतील इतक्या ह्या मूर्ति सुंदर आहेत.

## कृष्णबाग.

( ७ ) हा बाग कावसजी पाटील यांचे तळ्यापासून किंचित् लांब असून कांदेवाडीचे अगदीं नाक्यावर आहे. हा बाग लोहाणे जातीचे **वैकुंठवासी शेठ धनाजी उरकडा कांदेवाला यांच्या पत्नी कानबाई** यांनीं आपल्या पतीच्या स्मरणार्थ सुमारें सवालाख रुपये खर्च करून बागेंत मुरलीधराचें एक देवालय बांधविलें आहे. ह्या देवालयांतील मूर्ति सुमारें २ फूट उंचीच्या असून त्यांच्या मागें प्रभावळ आहे. मुरलीधराचे हातीं मुरली धारण केलेली असून ती तो वाजवीतच आहे असा भास उत्पन्न होतो ह्या मूर्तीचे बाजूस लक्ष्मीची मूर्ति असून तिचा उजवा हात मोकळा आहे व डावे हातांत एक सुवर्णाचा पेला धारण केलेला आहे. ह्या मूर्ति देखील शुभ्र स्फटिकांच्याच असून, ह्यांच्या पूजादिकांचा थाटही माधवबागेंतील व्यवस्थेप्रमाणेंच आहे. देवालयापुढें अष्टकोनी सभामंडप असून पुढें एक कारंजें आहे. देवळांतील गाभाऱ्याचें दरवाज्याचें काम साधेंच असून, भिंतीवर केलेलें कोरींव काम अत्यंत सुबक आहे. तसेंच सभामंडपाचे गाभाऱ्यांतील कोरींव काम अत्यंत, प्रेक्षणीय असें केलें असून, त्या कामांत देवादिकांचे वगैरे जे पुतळे कोरलेले आहेत ते इतके अत्युत्तम आहेत कीं, तें काम डोळे भरून पाहिल्याखेरीज लक्षांत येणार नाहीं.

मुरलीधराचे मूर्तीसमोर एका लहानशा देवळांत सर्पावर आरूढ झालेली व हात जोडून बसलेली अशी गरुडाची सुंदर मूर्ति स्थापन केलेली आहे. देवलयाचे बाजूस एका चाळींत सदावर्तही चाल आहे.

## सुंदरबाग.

( ८ ) सुंदरबाग हा रामवाडी व विठलवाडी ह्यांच्या जवळ असून काळबादेवी रोडवर आहे. ह्या सुंदरबागेंत द्वारकानाथाचें देवालय असून,

तें सुंदरदास मुळजी नामें एका श्रीमंत वाणी गृहस्थानें बांधलेलें आहे. म्हणून ह्यास ‘ सुंदरबाग ’ असें नांव ठेवण्यांत आलें आहे. ह्या देवालयांत शिरण्यास एक पश्चिमेस व दुसरा उत्तरेस असे मुख्य दोन दरवाजे आहेत. त्यांपैकीं पश्चिमेकडील दरवाज्यावर रिद्धिसिद्धिसहित गणपतीची मूर्ति कोरलेली असून वर एक घड्याळ बसविलें आहे. हा दरवाजा बहुतकरून सदोदित बंद असतो. देवालयांत शिरतांच मोठा भव्य व विशाळ असा सभामंडप दृष्टीस पडतो. ह्या सभामंडपाचा भुईतट संगमवरी दगडाचा केलेला आहे. दरवाज्याचे समोरच एके बाजूस भक्तजनांस जोडे वगैरे काढण्याकरितां जागा ठेवलेली आहे. सभामंडपावर तिन्ही बाजूंनीं ग्यालरी काढलेली असून तिचें व खांबांचें काम बरेंच सुबक केलेलें आहे. सभामंडपांत मूर्तीचे समोर एक कारंजें आहे परंतु तें नहमीं बंद असतें. कारणपरत्वें त्याचा उपयोग करीत असतात. गाभाऱ्यांत जाण्याच्या दरवाज्यावर रुपेरी पत्रा चढविलेला असून ह्या दरवाज्याचे वर समोरील भागावर श्रीकृष्णानें अंगुलीनें गोवर्धन पर्वत उचललेला आहे व त्याचे संवगड्यांनी त्यास काठ्यांचा आधार लावलेला आहे असा उत्तम देखावा दाखविला आहे. दरवाज्याचे दोहों बाजूंस जयविजय असून त्यांचेच दोहों बाजूंस कोनाड्यासारखा आकार दाखवून तेथें गोपी हातांत हात घालून फुगड्या खेळत आहेत असा देखावा आहे. तसेंच त्याच्या खालीं गाईचीं चित्रें कोरलेलीं आहेत व त्यांचेच बाजूला एके बाजूस सारंगीवाला सारंगी व दुसरे बाजूस तबलजीवाला तबला वाजवीत आहेत असें दाखविलें आहे. तसेंच देवळाचे बाह्यभागावर उत्तरेकडून व पश्चिमेकडून साधुसंतांचीं वगैरे सुंदर चित्रें फारच उत्कृष्ट कोरलेलीं आहेत.

श्रीद्वारकानाथजीची मूर्ति काळ्या स्फटिकाची घडलेली असून, तिला एका चौकोनी उंच चौथऱ्यावर स्थापन केलेली आहे. मूर्तीच्या चारहि हातांत शंख, चक्र, गदा व पद्म हीं आयुधें अनुक्रमें धारण केलेलीं

आहेत. द्वारकानाथजीचा पोषाख नेहमीं किनखापी असून पागोटें वल्लभपंथानुयायी महाराजाप्रमाणें असतें.

ह्या देवाचें दर्शन सकाळीं ६-७-९ वाजतां व सायंकाळीं ४-५-६ वाजतां असें मिळून एकंदर सहा वेळां दर्शन होत असतें. बाकीच्या प्रसंगीं दरवाजा बंद असतो. एकंदरींत ह्या देवळाचें काम फारच सुबक केलेलें असून प्रेक्षणीय आहे ह्यांत मुळींच संशय नाहीं.

## काळबादेवी.

( ९ ) हें देवालय काळबादेवी रोडवर सुंदरबागेपासून अगदीं थोड्याशा अंतरावर आहे. ज्या वेळीं सरकारनें काळबादेवी रोड वाढविला त्या वेळीं त्यांनीं जुनें देऊळ मोडून टाकलें व पुन: लगेच हल्लींच्या जागीं देऊळ बांधविण्याचा सर्व खर्च देऊन देवीच्या मूर्तीची स्थापना करविली. हें देऊळ लहानच पण टुमदार बांधलेलें असून, घुमटाच्या बाजूला चारहि कोंपऱ्यांवर चार पुतळे बसविले आहेत. दरवाज्यासमोर दोन दीपमाळी आहेत. ह्या देवीची वर्षांतून एकदां मार्गशीर्ष वद्य अमावास्येस जत्रा भरत असते. ह्या देवीस कित्येक लोक ' **कालिका देवी** ' असेंहि म्हणतात.

## बाबुलनाथ.

( १० ) चौपाटीच्या पुढें डावे बाजूस जी एक टेंकडी आहे त्या टेंकडीवर एक शिवलिंग स्थापन केलेलें आहे. ह्यासच बाबुलनाथ असें ह्मणतात. ही टेंकडी वाळकेश्वराच्या टेंकडीचाच एक भाग आहे. ह्या टेकडीवर जातांना प्रथम देवदारी पाट्यांचे बनविलेले रंगीत दोन दरवाजे लागतात. त्यांपैकीं एका दरवाज्यावर ' **दर्शन घ्यावयास जाण्याचा रस्ता** ' व दुसऱ्या दरवाज्यावर ' **दर्शन करून परत जाण्याचा रस्ता** ' असें लिहिलें आहे. ह्या देवालयास सुमारें १२५ पायऱ्या चढून वर जावें लागतें व उतरतेवेळींहि जवळ जवळ तेवढ्याच पायऱ्या उतरून खाला यावें लागतें. पायऱ्या चढून गेल्यावर समोरच पूर्वाभिमुखी श्रीबा-

बुलनाथाच्या मंदिरांत प्रवेश होतो. ह्या देवळाचा आकार फार मोठा नाहीं, परंत सभामंडप व बाजूच्या दालनांनीं आकार विस्तृत दिसतो. गर्भगृहांत मध्यभागीं शिवलिंग आहे. हें शिवलिंग स्वयंभु आहे असें म्हणतात. गर्भगृहाचे पूर्वेकडील दरवाज्याशिवाय दाक्षिणोत्तर बाजूला गर्भगृहास दोन दरवाजे आहेत. सभामंडपांत शिवलिंगासमोर कृष्ण पाषणाची बनविलेली नंदिकेश्वराची एक मूर्ति आहे. ह्या नंदिकेश्वराचे एके बाजूस बलभीमाचें व दुसरे बाजूस गणपतीचें टुमदार देवालय आहे.

ह्या देवालयापुढें पुनः एक दुसरा नवीन सभामंडप बांधलेला आहे. ह्या सभामंडपाचे भुइतटावर फुटक्या कपबशांच्या तुकड्यांचें जें रंगीबेरंगी नकशी काम केलेलें आहे तें अत्यंत सुरेख साधलें आहे. शिवाय भिंतीवर देवादिकांचीं नाना तऱ्हेचीं फारच मनोहर अशीं चित्रें काढलेलीं आहेत. ह्या सभामंडपाचे एके बाजूस पुनः एक बलभीमाचें देवस्थान आहे. ह्या देवस्थानासमोर एक कारंजें आहे; तें **श्रीमंत तात्यासाहेब यशवंतराव होळकर** यांनीं एक हज़ार रुपये खर्चून बांधविलें व बाबुलनाथास अर्पण केलें. मुख्य देवालयाच्या मागील बाजूस पुजारी वगैरे लोकांच्या जागा आहेत. त्यांच्या पलीकडे उत्तरेस पुनः शिवलिंग, लक्ष्मीनारायण, विराटस्वरूप यांचीं लहान लहान टुमदार देवालयं आहेत.

येथें प्रतिवर्षी महाशिवरात्रीस व श्रावणमासांतील प्रति सोमवारास मोठी जत्रा भरत असते. त्या वेळेस ह्या देवालयांत महोत्सव करविण्यांत येत असतो. श्रावण मासांतील प्रति सोमवारास लोण्याचा निरानिराळा अप्रातिम देखावा करीत असतात. ह्या देखाव्याचें नकशी काम इतकें सुबक व मनोहर केलेलें असतें कीं, तो देखावा प्रत्यक्ष डोळे भरून पाहिल्याखेरीज त्याची कल्पना होणें शक्य नाहीं.

बाबुलनाथाचे देवालयास जी अनेक श्रीमंत लोकांनीं मदत केलेली आहे, त्यांचीं नांवें संगमरवरी दगडावर कोरलेलीं असून त्या त्या नांवांपुढें

रुपयांचे आंकडेहि घातलेले आहेत. ह्या आकड्यांची संख्या जवळ जवळ पाऊण लाख रुपयांचेवर गेली आहे. हें स्थान मुंबईत एकान्त व उंच अशा टेंकडीवर असल्यामुळें फारच रम्य व हवेशीर आहे. या टेंकडीवरून मुंबापुरीचा देखावा फारच उत्तम दिसतो.

## लीलावती अथवा गावदेवी.

( ११ ) हें देवालय चौपाटीनजीक गिरगांवांत असून, जवळच दुसरें एक नर्मदेश्वराचें देऊळ आहे. ह्या नर्मदेश्वराचे समोर एक तलाव आहे. ह्यासच ‘ पुष्करणी ’ असें म्हणतात. ह्या देवीविषयीं कित्येक लोक अशी दंतकथा सांगतात कीं, ही देवी फार प्राचीन काळची असून हिचें मूळ नांव लीलावती असें आहे. परंतु दोनशें सव्वादोनशें वर्षांपूर्वीं ही देवी वाळकेश्वराचे टेंकडीवर होती. एके दिवशीं येथील रहिवासी रा. रा. बाबाजी म्हात्रे सोमवंशीय क्षत्रिय पाठारे ह्यांना देवीनें स्वप्नांत असा दृष्टांत दिला कीं, माझी तूं तुझ्याहस्तें गांवांत स्थापना कर. तेव्हां म्हात्रे यांनीं आपले ज्ञातींतील प्रमुख मंडळीस दृष्टांत कळवून सर्वांचा रुकार पडतांच देवीची मूर्ति गांवांत आणून हल्लींच्या जागीं मोकळ्या जागेवर देवीची स्थापना केली व तेथें एक वडाचें रोपडें लाविलें. पुढें कित्येक वर्षें लोटल्यानंतर एके दिवशीं मोठें तुफान झालें त्या तुफानांत तो वटवृक्ष मोडला गेला. तेव्हां शके १७२८ मध्यें रा. रा. बाळाजी भिकाजी सोमवंशीय क्षत्रिय पाठारे यांनीं देवीचें देवालय बांधलें. हें देवालय बंगल्याचे धर्तीवर बांधलेलें असून देवीचे समोर एक विस्तीर्ण सभामंडप आहे. सभामंडपावर तिन्ही बाजूंनीं ग्यालऱ्या काढलेल्या आहेत. ह्या देवीप्रीत्यर्थ जो खर्च करविण्यांत येत असतो तो सर्व सोमवंशीय क्षत्रिय लोकच चालवीत असतात. ह्या देवीची जत्रा मार्गशीर्ष शु॥ पौर्णिमेस भरत असते. शिवाय रामनवमीचे व नवरात्राचे उत्सव होत असतात. देवीची गांवांत स्थापना केली तेव्हांपासून लोक हिला लीलावती देवी न ह्मणतां

गांवदेवी ह्मणूनच संबोधूं लागले हल्लीं गांवदेवी ह्या नांवानेंच ह्या देवीची प्रसिद्धी आहे.

## वालुकेश्वर.

( १२ ) मुंबई बेटाच्या नैर्ऋत्य दिशेस जी एक टेंकडी आहे तिला हिंदु लोक वाळकेश्वरचा डोंगर व युरोपियन लोक मलबार हिल असें ह्मणतात. ह्या डोंगरीवरच वालुकेश्वराचें फार प्राचीन काळचें देऊळ आहे. ह्या देवालयाचे बाजूस इतर देवालयें व बऱ्याच धर्मशाळा आहेत. मध्येंच एक मोठें तळें आहे. ह्यासच बाणगंगा असें ह्मणतात. मुंबईतील श्रीमंत लोकांनीं वर्गणी गोळा करून हें तळें बांधलें असून त्यांत स्वच्छ व गोड अशा विहारच्या तलावांतील पाण्याचा नळ सोडलेला आहे.

वालुकेश्वर ह्या शब्दाचा अर्थ अगदीं स्पष्ट आहे. वाळूनें केलेला ईश्वर तो वालुकेश्वर. हें लिंग श्रीरामचंद्रानें स्थापन केलेलें आहे अशी दंतकथा आहे. वालुकेश्वर महात्म्यांत असें ह्मटलें आहे कीं, राम व लक्ष्मण हे अयोध्येहून लंकेस जात असतां ह्या टेंकडीवर समुद्रकांठीं आले त्या वेळीं रामाचा असा नियम होता कीं, नित्य लक्ष्मणाकडून काशीहून एक शिवलिंग आणवावें व त्याची पुजा करावी. एके दिवशीं लक्ष्मणास परत येतांना नियमित वेळेपेक्षां अधिक विलंब झाल्यामुळें, रामानें तेथील वाळूचें एक शिवलिंग तयार करून तेथेंच त्याची स्थापना करून पुजा केली. इतक्यांत लक्ष्मण पण येऊन पोहोंचला. तेव्हां त्यानेंहि आणलेल्या शिवलिंगाची तेथेंच कांहीं अंतरावर स्थापना केली. हल्लीं आपण ज्यास वालुकेश्वर ह्मणतों तो वस्तुतः लक्ष्मणेश्वर आहे. श्रीरामचंद्रानें स्थापन केलेलें शिवलिंग कोठेंच आढळत नाहीं.

तद्वतच बाणगंगेविषयीं अशी दंतकथा आहे कीं, वरील शिवलिंग श्रीरामचंद्रानें स्थापन केल्यावर त्यांना तहान लागली. पण पाणी कोठेंच

मिळेना. म्हणून श्रीरामानें एक बाण मारून त्या ठिकाणीं पाणी काढलें म्हणून ह्या तळ्यास बाणगंगा असें म्हणतात.

येथें शिवाय दुसरीं शंकराचीं देवालयें असून श्रीगजानन महाराजांचेंहि एक देवालय आहे. येथें मोठमोठे वाणी, भाटे, वगैरे श्रीमंत लोक येऊन दानधर्म करीत असतात. कित्येकांचीं तर येथें अन्नसत्रेंहि घातलेलीं आहेत. येथें वर्षांतून दोनदां यात्रा भरत असते. यात्रेच्या दिवशीं लिंगावर शंकराचा मुकूट घालून उत्तम कपडे परिधान करून लिंग सुशोभित करीत असतात.

येथील देवळांच्या शेजारीं बऱ्याच धर्मशाळा आहेत. परंतु त्या मालकाच्या किंवा श्रीमंत लोकांच्याच विशेष उपयोगी पडतात. गरीब लोकांच्या क्वचित् उपयोगी पडतात. कोणास येथील धर्मशाळेची जरूरी असली तर त्यास धर्मशाळेच्या मालकाची परवानगी घ्यावी लागते.

## महालक्ष्मी.

( १२ ) हें देऊळ ताडदेवपासून सुमारें एक मैलावर वार्डन रोडनजीक समुद्राच्या कांठीं एका लहानशा टेंकडीवर आहे. महालक्ष्मीच्या मंदिरांत आटोपशीर असें गर्भगृह असून त्यापुढें लहानसा मंडप आहे. गाभाऱ्यांत मध्यभागीं सुमारें दीड हात उंचीच्या टुमदार ओऱ्यावर छानदार मखरांत तीन पाषाणमूर्ति आहेत. त्यांपैकीं मधली महालक्ष्मी असून तिच्या उजव्या व डाव्या बाजूस अनुक्रमें महाकाली व महासरस्वती ह्या आहेत. ह्या तिन्ही मूर्ति सिंदूरचर्चित आहेत. महालक्ष्मी चतुर्भुज असून व्याघ्रारूढ अशी सुमारें ३ फुट उंच आहे. महाकाली व महासरस्वती यांच्या मूर्ति अडीच आणि दोन फूट उंचीच्या असून महिषासुर व मयूर यांजवर आरूढ झालेल्या आहेत. ह्या देवींना नेहमीं सुवर्णाचे मुखवटे व शृंगार घालीत असल्यामुळें मूळ मूर्तींचें क्वचितच दर्शन होतें. पुढील सभामंडपांत देवीच्या समोर पाषाणाचा सिंह

बसविलेला असून त्यावर चांदीच्या पत्राचें कवच चढविलें आहे. महालक्ष्मीच्या गर्भगहांत व पुढील सभामंडपांत संगमवरी दगडांची फरसबंदी केलेली आहे. सभामंडपाचे पुढील भागांत ४।५ दीपमाळा असून सभोंवतीं दगडी फरसंबदी केलेली आहे.

ह्या देवीची पूजाअर्चा अष्टौप्रहर चाललेलीच असते. गर्भगृहांत एक मोठा तुपानें भरलेला नंदादीप अहोरात्र जळत असतो. देवीचे दर्शनाप्रीत्यर्थ दर मंगळवार व शुक्रवार ह्या दिवशीं भक्तजनांची विशेष गर्दी होत असते. येथें नवरात्रांत मोठी जत्रा भरत असते. आश्विन शुद्ध अष्टमीचे दिवशीं येथें मोठा होम होत असतो. त्या वेळीं मुंबईतील हजारों श्रीमंत व धार्मिक लोक होमकुंडांत तुपाचीं बुधलीं ओतीत असतात. हा होम मोठा जबरदस्त होत असून या नऊ दिवसांत देवीचे घाटाचा थाट मोठा अप्रतिम होत असतो.

महालक्ष्मीचे मंदिराचे पाठीमागें हल्लीं एक नवीन धर्मशाळा बांधविण्यांत आली आहे. ही धर्मशाळा स्वर्गवासी ठा. भगवानदास रतनशी यांचे स्मरणार्थ ठा० गोकुळदास व रतनशी डुंगरशी यांनीं इ० स० १९२१ सालीं बांधून ती महालक्ष्मीला अर्पण केली आहे. देवीप्रीत्यर्थ कोणतेंहि सार्वजनिक कृत्य करावयाचें असल्यास ह्या धर्मशाळेचा उपयोग करीत असतात. ह्या धर्मशाळेस लागून एक लांकडी जिना बसविलेला आहे. ह्या जिन्यानें वर गेलें असतां गच्ची दृष्टीस पडते. ह्या गच्चीवर फुटक्या कपबशांचे पांढरे तुकडे बसविलेले आहेत. ह्या गच्चीवरून लांबचे लांब पसरलेला समुद्राचा देखावा व ईशान्य दिशेस गिरण्यांच्या चिमण्यांची उसळलेली गर्दी पाहून प्रत्येक मनुष्याचें मन विचारानें थक्क होऊन जातें. येथील हवा महाबळेश्वराच्या हवेसारखी अत्युत्तम असल्यामुळें आजारी लोक हवापालट करण्याकरितां येथें येत असतात.

महालक्ष्मीचे देवालयानजीक धाकजी दादाजी नांवाच्या एका प्रभू गृहस्थानें एक देवालय बांधलें आहे. त्यांतील सर्व देवांस त्यानें आपल्या मुलांचीं नांवें दिलीं असून मुख्य शंकराचे लिंगास 'धाकलेश्वर' म्हणून आपलें स्वतःचेंच नांव दिलें आहे. एकमेकांस लागून एकंदर पांच देवालयें आहेत. मध्यभागीं धाकलेश्वर असून त्याचे दक्षिणबाजूस मयुरेश्वर व रमेश्वरी तसेंच उत्तर बाजूस हरीनारायण व विनायकादित्य अशीं देवालयें आहेत. ह्या देवांचे दर्शनास फारसें कोणी जात नाहींत. ह्या देवालयापुढें एक मोठें विस्तीर्ण दगडांची फरसबंदी केलेलें पटांगण आहे. पटांगणांत दोहोंबाजूस दोन दीपमाळा आहेत. हें देऊळ समुद्रांतून सुमारें २५ कोसांवरून दृष्टीस पडतें असें म्हणतात.

महालक्ष्मीचे देवालयापासून एक फर्लांगाचे अंतरावर एक तळें आहे. ह्या तळ्यास सुमारें ४०,००० रुपये खर्च करून तें तुळशीदास गोपाळदास नामें भंगसाळ्यानें इ० स० १८२४ सालीं बांधिलें आहे. तळ्याचा आकार जहाजाकृति बनविलेला आहे. ह्यांतील पाणी स्वच्छ नसतें. पश्चिमेस एक देऊळ आहे, त्यांत शंकर व रणछोडजी यांच्या मूर्ति आहेत. ह्या देवालयाच्या भिंतीवर उत्तमोत्तम अशीं सुंदर चित्रें काढलेलीं आहेत.

महालक्ष्मीसंबधानें अशी दंतकथा आहे कीं, वरळी व मुंबई यांचे दरम्यान जी एक खाडी आहे ती बांध बांधून तिजवरून गाडीवाट करावी असें इंग्रज सरकार कंपनी बहादूर ह्यांचे मनांत, एके समयीं आलें. सबब हा बांध बांधविण्यासाठीं सरकारनें अतिशय मेहनत घेतली. परंतु इच्छित हेतु कांहीं सिद्धीस जाईना. ह्याप्रमाणें हा क्रम कित्येक दिवस चालू असतां एके दिवशीं महालक्ष्मी, महाकाली व महासरस्वती ह्यांचे मनांत असें आलें कीं, क्षीरसागरांतून आपण बाहेर पडावें व मुंबईस वास्तव्य करून भक्तांच्या मनकामना पूर्ण करून प्रसिद्धीस यावें. ह्या

बांधकामाचे मार्गांत ह्याच देवतांचें वास्तव्य असल्यामुळें सरकारचा हेतु सिद्धीस जाईना. तेव्हां सरकारी इंजिनिअर रामजी शिवजी परभू ह्यास वरील तिन्ही देवतांनीं स्वप्नांत असा दृष्टान्त दिला कीं, आह्मीं क्षीरसागरांत वास्तव्य करीत आहोंत तरी आह्मांस तूं बाहेर काढून ( हल्लीं ज्या ठिकाणीं देवालय आहे ) त्या टेंकडीवर देवालय बांधून आमची स्थापना कर. असें त्वां केल्यास आह्मीं संतुष्ट होऊन बांध बांधावयास अनुकूल होऊन तझ्या हस्तें बांध बांधवूं. मी बांध बांधून देतों अशी तूं सरकारांत बेलाशक हमी भर. तुला हुकूम मिळतांच प्रथम तूं समुद्राचें खाडींत जाळें टाक, म्हणजे त्या जाळयांत अडकून आम्ही समुद्रांतून बाहेर येऊं. असा दृष्टान्त होतांच रामजी शिवजीनें देवीचे आज्ञेवरून दुसरे दिवशीं सरकारांत अशी हमी भरली कीं, जर सरकार मला हुकूम करील तर मी खात्रीनें बांध बांधून देतों. सरकारानें ही गोष्ट मान्य करून बांध बांधून काढण्याची त्यास परवानगी दिली. हुकूम मिळतांच दृष्टान्ताप्रमाणें खात्री होण्यासाठीं रामजीनें प्रथम त्या खाडींत जाळें टाकलें तोंच रामजीच्या सुदैवेंकरून त्या पाषाणी तिन्ही मूर्ति जाळयात आपोआप बसून जाळयाचा एक धागाहि तुटूं न देतां वर आल्या. मग रामजी शिवजीनें बांधकाम पूर्ण करून हल्लीं देवालय असलेली जागा सरकारकडून बक्षीस मागून घेऊन त्या जागेवर देऊळ बांधून त्या तिन्ही मूर्तींची स्थापना केली त्या दिवसापासून आजमितीपावेतों ह्या मूर्ति अचल आहेत.

पुढें कांहीं दिवसांनीं गोविंदजी शेठ, सोनार शेठ व माणकी कोळीन ह्यांनीं निरनिराळ्या तीन धर्मशाळा बांधल्या. हल्लीं येथें एक सदावर्तहि चालू असून समोरच एक संन्याशी आश्रम आहे.

## जुम्मा मशीद.

( १४ ) ही मशीद मंगळदास मार्केटनजीक एका मोठ्या तळ्याचे कांठीं बांधलेली आहे. मुसलमान लोकांच्या मशिदींपैकीं सर्वांत मोठी व

प्रसिद्ध मशीद म्हटली म्हणजे **जुमा मशीद** हीच होय. जुमा म्हणजे शुक्रवार, शुक्रवारास हे लोक महा पवित्र दिवस समजतात. ह्या मशिदीची व्यवस्था पहाण्याचें काम सरकारच्या मंजुरीनें बारा इसमाकडे सोंपविलेलें आहे. ह्या बारा इसमांत काजी व नाझर हे मुख्य असतात. ह्या मशिदींत एक धर्मगुरु आहे. त्याचें काम दर जुमाचे दिवशीं ( शुक्रवारीं ) व वर्षांतून मुख्य दोन ईदी ह्या दिवशीं कलमा पढण्याचें असतें. एक मुल्ला नेहमींचा निमाज पढण्याकरितां नेमलेला असतो. निमाज पढण्याची वेळ बारा वाजेपासून एक वाजेपर्यंत असते. एक बांगी असतो त्याचें काम बांग पुकारण्याचें असतें. ह्याशिवाय कांहीं नोकर लोक असतात.

ह्या मशिदींत एक शाळा असून तींत **आरबी, फारशी** व **उर्दु** ह्या भाषा शिकविल्या जातात.

ह्या माशिदीशिवाय येथें **सातताड मशीद, हाजी इस्मायल हबीबची मशीद, मोंगल मशीद, जकेरिया मशीद** वगैरे कांहीं माशिदी प्रसिद्ध आहेत. शिवाय ज्या ज्या बाजूस मुसलमान लोकांची वस्ती विशेष आहे त्या त्या बाजूस निदान एक तरी मशीद आहे. ह्या माशिदींची सर्वातोपरी व्यवस्था ठेवण्याकारितां प्रतिवर्षी प्रत्येक मुसलमानास थोडीफार वर्गणी द्यावी लागते असें म्हणतात.

## मामाहजानी नांवाचे प्रसिद्ध ठिकाण.

( १५ ) वरळीचे बांधाचे अगदीं टोंकाजवळ पश्चिमेस जी एक टेंकडी आहे त्या टेंकडीपासून शेंदोनशें हातावरील जागेस '**मामाहजानी**' असें म्हणतात. हें प्रसिद्ध ठिकाण महालक्ष्मीच्या मंदिराचे उत्तरेस २।३ फर्लांगाचे अंतरावर समुद्राचे कांठीं एका टेंकडीवर आहे. येथें एक हाजी अल्ली नामक मुसलमानाचें कबरस्थान आहे. ह्या कबरीची एवढी प्रख्याति होण्याचें कारण असें ऐकण्यांत येतें कीं, पूर्वीं हाजी अल्ली उर्फ मामा नामें एक सधन मुसलमान राहात होता. ह्यास एक बहीण होती. ही बहीण

भावंडें मोठीं देवभक्त असल्यामुळें, ह्यांनीं आपली सर्व मिळकत गोर-गरिबांस दानधर्म करून टाकली व पुढें हीं बहीणभावंडें मक्केस निघून गेलीं. कित्येक दिवस लोटल्यानंतर ' **हज** ' करून आल्यावर **हाजी अल्ली** हा फकीर बनून वरील टेंकडीवर येऊन राहिला. त्याचे बहिणीनेंहि आपल्या भावाप्रमाणेंच वर्तणूक ठेविली. मुसलमान लोकांमध्यें कोणीहि मुसलमान मक्केची यात्रा करून आल्यास त्यास '**हाजी**' व स्त्रियेस ' **हाजीआनी** ' असें ह्मणतात. हाजीआनी ह्या शब्दाचा हजानी असा अपभ्रंश होऊन ' **मामाहजानी** ' हा शब्द प्रचारांत आला. कित्येक वर्षांनीं हीं बहीण-भावंडें मरण पावलीं. पुढें त्यांनीं सांगून ठेविल्याप्रमाणें हाजी अल्लीची कबर समुद्रांत व हाजीआनीची कबर एका खडकावर बांधविण्यांत आली येथें साक्षात्कार होत असतो असें कित्येकांचें ह्मणणें आहे. शिवाय ह्या साक्षात्काराविषयीं अशीहि वदंता ऐकण्यांत येते कीं, समुद्रास कितीहि भरती आली तरी त्याचें पाणी कबरीस केव्हांहि स्पर्श करूं शकत नाहीं. कबरीच्या पायथ्याशीं ,पाणी येतांच तें कमी होतें. शिवाय ह्या कबरी-जवळचें पाणी खारट नसून गोड आहे असेंहि म्हणतात.

## माहिमचा उरूस.

( १६ ) माहिमास **मखदुम बाबा** व त्याची **आई** ह्या दोघांच्या परस्परांशेजारीं कबरी बांधलेल्या आहेत. ह्यांचे नांवाचा माहीम येथें मार्गशीर्ष शु॥पौर्णिमा अगर प्रतिपदेस मोठा उरूस भरत असतो. तेव्हां-पासून हा उरूस सारखा आठ दिवस राहतो. ह्या उरुसास लोकांची अतिशय गर्दी होत असते.

## मुंबईतील प्रसिद्ध मार्केटें.

मुंबईसारख्या बकाली शहरांत बरेंचसे बाजार असणें अत्यंत महत्वाचें आहे. कारण ह्या शहरांत लोकवस्तीच्या मानानें ज्या कांहीं नित्यशः उलाढाली होत असतात व जो कांहीं लाखों रुपयांचा व्यापार चालत

असतो, त्या मानानें पाहूं गेलें असतां मार्किटें, बाजारांची संख्या व व्यापारांचे अड्डेहि विशेष असले पाहिजेत हें निराळें सांगावयास नकोच. ह्यांपैकीं खालीं कांहीं प्रसिद्ध मार्किटांचें वर्णन थोडक्यांत दिलें आहे तें वाचकांनीं वाचून पहावें.

## क्राफर्ड मार्केट.

( १७ ) हें मार्केट अबदूल रहिमान स्ट्रीटचे अगदीं टोंकास असून, सिताराम बिल्डिंगनजीक आहे. हें मार्केट मुंबईतील इतर भाजीपाल्यांच्या मार्किटांपेक्षां सर्वांत मोठें असल्यामुळें, ह्यानें बरीचशी जागा व्यापली आहे. हें मार्केट बांधून काढण्यास इ० स० १८६५ मध्यें आरंभ होऊन, तें पूर्ण होण्यास जवळ जवळ चार वर्षें लागून, ह्यास एकंदर १९, ४९,७०० रुपये खर्च झाले आहेत. ह्या मार्केटास मुख्य तीन दरवाजे आहेत. त्यांपैकीं पश्चिम बाजूस जो एक मोठा दरवाजा आहे त्या दरवाज्याचे भिंतीवर वरील बाजूस एक मनुष्य विहिरीवर मोट हांकीत आहे. विहीरींतून कोणी पाणी काढीत आहे, कोणी पाण्याचा घडा भरून घेऊन जात आहे वगैरे सुंदर देखावा दाखविला आहे. तसेंच दक्षिण बाजूचे दरवाज्यावरील भिंतीवर एक मनुष्य केळीं व अननस यांनीं भरलेलें टोपलें घेऊन जात आहे, एक बाई द्राक्षें विकावयास बसली आहे, तिचे बाजूस एक बाई आपल्या मुलाला कडीवर घेऊन उभी आहे, जवळच पुनः एक एक खटारा उभा आहे अशा तऱ्हेचा नयनमनोहर देखावा दाखविण्यांत आला आहे. ह्या मार्केटांत शिरतांच प्रथम एक कारंजें दृष्टीस पडतें. हें कारंजें **सर कावसजी जहांगीर** यांनीं बांधिलें असून त्याचे चौबाजूंस जमिनीवर संगमवरी शुभ्र दगड बसविलें असल्यामुळें ही जागा फारच रमणीय भासते. ह्या मार्केटचें काम लोखंडी केलेलें असल्यामुळें वर पाहिलें असतां जिकडे तिकडे सर्व लोखंडच लोखंड दृष्टीस पडतें. हें लोखंडी केलेलें अवाढव्य काम पाहून मनुष्य अगदीं थक्क होऊन जातो.

ह्या मार्केटामध्यें एक मोठा सुंदर दिवाणखाना बांधलेला असून त्यांत " **सुपरिंटेंडेंट ऑफ मार्किटस्** " हे रहात असतात. ह्यांचेकडे ह्या मार्केटाची सर्वतोपरी व्यवस्था पाहण्याचें काम सोंपविलेलें आहे. येथें रात्रीं ग्यासचे दिवे लावीत असतात. ह्या मार्केटचे मनोऱ्यावर चौबाजूंस चार घड्याळें बसविलेलीं आहेत; तीं बरींच मोठीं असल्यामुळें फार लांबून दिसतात. रात्रींच्या प्रसंगीं वेळ समजावा म्हणून ह्यांत देखील ग्यासच्या दिव्यांची योजना केलेली आहे. ह्या घड्याळांचा वेळ मुंबईटाईमप्रमाणें ठेवलेला असतो. हें मार्केट चार वाजेपासून रात्रीचे नऊ वाजेपर्यंत उघडें असतें.

ह्या मार्केटांत सर्वोत्तम अशी सर्व तऱ्हेची फळफळावळ, सर्व तऱ्हेचा भाजीपाला, सर्व प्रकारचा किराणामाल, नागवेलीचीं व केळीचीं पानें, सर्व तऱ्हेचीं सुंदर फुलें, फुलांचे बनविलेले फॅशनेबल सुवासिक हार, तुरे, गजरे, फॅंसी स्टेशनरी सामान वगैरे सर्व प्रकारचे बहुतेक जिन्नस मिळत असतात.

ह्या मार्केटांत एक लहानसा बाग आहे. त्यांत बसण्याकरितां ठिकठिकाणीं बांक ठेविले आहेत, व बसणारास छाया मिळावी म्हणून त्यांजवर वेलींचे लतामंडप केलेले आहेत. बागेचे शेजारीं पांखरें विकणारांचीं दुकानें आहेत. त्यांत हजारों जातींचे नानातऱ्हेचे पक्षी असतात. कित्येक पक्षी अति मौल्यवान असतात. पक्षीबाजाराचे शेजारीं घाऊक माल विकण्याकरितां जी पडवी केलेली आहे; तींत सकाळीं नऊ दहा वाजेपर्यंत घाऊक फळफळावळ विकत घेणारांची एकच घाई उडालेली दृष्टीस पडते. शिवाय ह्या मार्केटशेजारीं एक मासळी बाजार असून त्या बाजाराशेजारींच कोंबड्यीं, बदकें वगैरे प्राणी विकण्याचाहि एक बाजार आहे.

हें मार्केट इतकें सुंदर व मनोवेधक बांधलें आहे कीं, त्यांतील सर्व साधारण देखावा, त्यांत केलेल्या सर्व प्रकारच्या सोयी, आंतील नीटनेटकेपणा व स्वच्छता इत्यादि गोष्टींत ह्याची बरोबरी करणारें मार्केट अन्यत्र कोठेंच पहाण्यांत येत नाहीं.

## नळबाजार मार्केट.

( १८ ) हें मार्केट सँडहर्स्ट रोडवर डंकन रोडच्या बाजूला आहे. येथेंहि कांहीं अंशीं क्राफर्ड मार्केटाप्रमाणें व्यवस्था असून, ह्याचेंहि सर्व काम लोखंडीच केलेलें आहे. हें मार्केट बांधून काढण्यास एकंदर खर्च १, ३७,००० रुपये आलेला आहे. ह्या मार्केटांत भाजीपाल्याचा खप मात्र इतर सर्व मार्केटांपेक्षां विशेष आहे. ह्या मार्केटांत फुलें, हार, तुरे व गजरे विकण्याची बरींचशीं दुकानें आहेत. शिवाय किराणा, सर्व जातींची वनस्पति वगैरे जिन्नस मिळत असतात. ह्या मार्केटचे एके बाजूस **मासळी बाजार** असून दुसरे बाजूस **बांगडी बाजार** आहे. तिसरे बाजूस एक लहानशी गल्ली आहे तींत सकाळीस नागवेलींचीं पानें फार सोयस्कर मिळत असतात. ह्या मार्केटनजीक सुमारें चार पांच वाजतां एक **भिकारी बाजार** भरत असतो. त्यांत भिकारी लोक दिवसभर भिक्षा मागून आणलेला दाणादुणा आणून तो विकीत असतात.

## भुलेश्वर मार्केट.

( १९ ) हें मार्केट भुलेश्वराचे देवळानजीक असून पहिल्या व दुसऱ्या भोई-वाड्याचे अगदीं नाक्यावर आहे. हें मार्केट लहानसेंच पण टुमदार बांधलेलें असून ह्याचें बांधकाम दगडी केलेलें आहे. ह्या मार्केटमध्यें भाजी-पाला, फळफळावळ किराणा माल मिळत असून त्यांत बहुतकरून वाणी, भाटे, ब्राह्मण, श्रावक वगैरे अमांसाहारी लोकांची गर्दी विशेष असते, येथें भाजीपाला इतर सर्व मार्केटांपेक्षां उत्तम मिळत असतो. ह्या मार्केटमध्यें वरील मजल्यावर एक **म्युनिसिपल् गुजराथी शाळा** आहे.

## आदमजी पीरभाई मार्केट.

( २० ) हें मार्केट बी. बी. सी. आय् रेल्वेच्या मरीन लाइन्स स्टेशना-नजीक **आदमजी पीरभाई** नांवाचे एका सधन बोहरी गृहस्थानें बांधिलें आहे. ह्मणून ह्यास त्याचेंच नांव देण्यांत आलें आहे. येथेंहि

भाजीपाला वगैरे उत्तम प्रकारचा माल विकण्यास ठेवीत असतात. हें मार्केट मुद्दाम धोबीतलाव व आजुबाजूस राहणाऱ्या लोकांच्या सोयी-साठीं बांधविण्यांत आलें आहे. मार्केट मरीन लाइन्स स्टेशनानजीक अस-ल्यामुळें कुलाब्यापासून चौपाटी, वाळकेश्वर इत्यादि रेल्वेच्या आजुबाजूस राहणाऱ्या लोकांना फारच सोयीचें झालेलें आहे. सकाळीं पांच वाजे-पासून रात्रीचे नऊ वाजेपर्यंत हें मार्केट उघडें असतें.

## पेडर मार्केट.

( २१ ) हें मार्केट माजगांवांत असून, ह्याचें काम साधेंच केलेलें आहे. ह्यास एकंदर २७,००० रुपये खर्च आलेला आहे. हें मार्केट बांधतेवेळीं मुंबईचे **म्युनिसिपल कामिशनर मि० पेडर साहेब** हे होते. त्यांच्या खटपटीमुळेंच हें मार्केट बांधलें गेलें ह्मणून ह्यास त्यांचेंच नांव देण्यांत आलें आहे. ह्या मार्केटाचे मोठे दरवाज्याजवळ फळफळावळ व भाजीपाला विकला जातो. ह्या मार्केटचे दुसरे बाजूस एक मासळी बाजार पण आहे.

## जहाजाविषयीं साधारण माहिती.

( २२ ) मुंबई बंदरास गेल्यावर जहाज पाहण्याची प्रत्येकास सहा-जिक इच्छा उत्पन्न होते. एकादें जहाज पहावयाचें झाल्यास कोणाचीच बहुतकरून परवानगी घ्यावी लागत नाहीं. एकादें जहाज पहाणें झाल्यास त्यास जी एक बाहेरून शिडी लावलेली असते, ती चढून वर जावें. तेथील भाग पाहून झाल्यावर वर जाण्यास पुनः एक लहानसा लोखंडी रंगीत जिना बसविलेला असतो, तो चढून वर जावें. त्या ठिकाणीं अस-लेलीं वाफेचीं यंत्रें, होकायंत्राची खोली, जहाज बुडावयाची अगर आग लागली आहे हें उतारू लोकांस सुचविण्याची जागा, तोफा, लहान लहान ठेवलेल्या होड्या वगैरे पाहून झाल्यावर, तेथें असलेल्या दरवाज्यांतून खालील मजल्यावर यावें. कारण आपणास एकादी इमारत बघावयाची झाल्यास आपण ज्याप्रमाणें खालून वर जात असतों; तद्वत् जहाज बघा-

वयाचें झाल्यास वरून खालीं जावें लागतें. खालील मजल्यावर गेलें ह्मणजे पहिला, दुसरा व तिसरा असे वर्ग लागतात. पहिल्या वर्गाचे लोकांस फारच उत्तम सोई केलेल्या असतात. त्यांचे जेवणाची सोय तर फारच उत्तम असते. शेजारींच एक स्वयंपाकगृह असतें. स्नान करावयाच्या, पोषाख करावयाच्या, निजावयाच्या व इतर जरुरीचें सामान ठेवावयाच्या वेगवेगळया लहान लहान व सुंदर अशा खोल्या काढलेल्या असतात. त्यांना 'केबिन' असें ह्मणतात. प्रत्येक केबिनमध्यें बहुतेक तीन उतारूंची सोय केलेली असते. व त्या केबिनींत उंच फळया बसवून त्यांवर बिछाने घातलेले असतात. ह्या निजावयाचे जागेस 'बर्थ' असें ह्मणतात. प्रत्येक बर्थवर सुंदर पडदे टांगलेले असून ते वर किंवा खालीं सोडतां येतात. प्रत्येक केबिनींत तोंड धुण्याकरितां 'वॉशींग टेबल' ठेवलेलें असतें. व त्यावर आरसे, कंगवे वगैरे उतारूंच्या सोईसाठीं ठेवलेले असतात. ह्या केबिनी चाकर माणसें नित्य झाडून धुऊन साफ करीत असतात. तसेंच बिछाने करणें, नित्य संध्याकाळीं दिवाबत्ती लावणें वगैरे कामें चाकर माणसें करीत असतात. पहिल्या वर्गाचे उतारूंस किंवा केबिनींत राहणाऱ्या उतारूंस भोजनाची जागा निराळी केलेली असते. त्या ठिकाणीं एक मोठें टेबल असतें. पहिल्या वर्गाचे उतारूंस हिंडण्याफिरण्याची देखील उत्तम सोय केलेली असते. स्नानास उन्ह किंवा थंड जसें पाणी हवें असेल तसें मिळतें. प्रत्येक स्नानाचे खालींत एक मोठें टांकीसारखें भांडें ठेवलेलें असतें, त्यांत सपशल पडून देखील स्नान करितां येतें व त्यास असलेली कळ फिरविली ह्मणजे समुद्राचें ताजें पाणी समुद्रांत पुनः जाऊन पडतें. पहिल्या वर्गाचे उतारूंस मी जहाजांत आहें असें मुळींच वाटत नाहीं मात्र जर तो वर येऊन पाहील तर त्यास तसें वाटेल.

जहाजांत धान्याचा भरपूर संग्रह करून ठेवीत असतात. जहाजावरील सर्व अधिकाऱ्यांत वरिष्ठ अधिकारी ह्मटला म्हणजे **कप्तान** हा होय.

ह्याचे हाताखालीं मालीम, इंजिनिअर, कोठारी, डाक्टर, खलाशी वगैरे मंडळी असते. कप्तानास जहाज चालविण्याचे कामीं मदत करणें, जहाज कोणत्या ठिकाणीं आलें आहे, कोणत्या ठिकाणीं खडक वगैरे आहे ह्याची चौकशी ठेवणें, सुकाण्याला हुकूम करणें, नियमित वेळांत जहाज किती मैल चाललें ह्याचें टांचण ठेवणें, वाऱ्याचे दिशेप्रमाणें जहाजाचीं शिडें चढविणें किंवा उतरविणें वगैरे कामें मालिमास करावीं लागतात. यंत्राची सर्वतोपरी खबरदारी ठेवणें एवढेंच काय तें काम इंजिनिअरकडे सोंपविलेलें असतें. धान्य पुरविण्याचें काम कोठाऱ्याकडे नेमलेलें असतें. ह्यास ' पर्सर ' असेंहि म्हणतात. उतारूंस औषधोपचार करण्याचें काम डाक्टरसाहेब करीत असतात. खलाशी लोक किरकोळ कामें करीत असतात.

जहाजांतील लहान लहान सुंदर दरवाजे, चिमुकले जिने, अरुंद रस्ते वगैरे सर्व प्रकारच्या सोई काढणाऱ्या शिल्पकारांची कुशलता पाहून कोणत्याहि मनुष्यास आनंद झाल्यावांचून राहत नाहीं.

एकंदरींत पाहूं गेलें असतां जहाजांतील रचना फारच प्रेक्षणीय असते. शिवाय बंदरांत असलेलीं जहाजें, चिखल काढणाऱ्या आगबोटी, तारवें व इतर लहानसहान होड्या, मचवे सतत इकडून तिकडे व तिकडून इकडे जात येत असतात. त्यामुळें बंदर कसें अगदीं फुलून गेलेलें दिसतें. ही बंदरांतील विलक्षण शोभा पाहून प्रेक्षकांचे मनास घटकाभर आनंद होणार नाहीं असा मनुष्यच सांपडणें कठीण !

---

# प्रसिद्ध गोद्या.

## प्रिन्सेस डॉक.

( २३ ) ही गोदी सर्व आशियाखंडामध्यें मोठी असून फारच सोई-स्कर आहे. हिची लांबी १४६० फूट असून रुंदी १००० फूट आहे. ही गोदी बांधून काढण्यास एकंदर खर्च ६७,४३,३९७ रुपये झाला आहे. आंत पाणी घेतलेली जागा तीस एकर असून तेथें मोठमोठे धक्के बांधलेले आहेत. ह्या गोदीमध्यें मोठमोठीं तीस जहाजें येऊं शकतात. हिला साठ फूट रुंदीचे दोन दरवाजे आहेत. ह्या गोदींत शिरतांच एक अपूर्व देखावा दृष्टीस पडतो. कोठें आगबोट गोदींत येत आहे; कोठें बोटी धुऊन स्वच्छ करण्यांत बोटीवरील लोक गुंतले आहेत; कोठें दुरुस्ती करीत आहेत; कोठें सामानाचे खटारे आंत येत आहेत; कोठें गोदींतून माल बाहेर नेत आहेत; अशी एकच गडबड चाललेली पाहून नवीन मनुष्य तर अगदीं चकित होऊन जातो.

आंत बोटी येण्याकरितां जो फ्लाईंग ब्रिज ( वाटेल तेव्हां काढतां व घालतां येणारा पूल ) केला आहे तो सहज एक दोन मनुष्यें कळसूत्र फिरवून कसा ओढून घेतात, व पुनः पूर्ववत् जसाचा तसा कसा सोडून देतात, वगैरे चमत्कार फारच अपूर्व आहेत. तसेंच कांहीं आगबोटींवरील वायरलेस ( बिनतारी ) तारायंत्रासंबंधाचीं तारांचीं जाळीं वगैरे पाहून नवीन मनुष्य कौतुकानें व आश्चर्यानें अगदीं दंग बनून जातो व त्यास वाटतें कीं, केवढें हें मानवी सामर्थ्य कीं, त्यानें ह्या प्रचंड आगबोटी व बिनतारी तारायंत्र ह्यांच्या सहाय्यानें खंडाखंडांमध्यें हजारों योजनें पसर-लेल्या महासागरास जणूं काय नाहींसें करून टाकिलें आहे. कोठें अमेरिका खंड व कोठें आशिया खंड, पण ह्या आगबोटी व बिनतारी तारायंत्र

ह्यांच्या योगानें हीं दोन्हीं खंडें एकमेकाशेजारींच आणून ठेविलीं आहेत कीं काय असें वाटतें. ही सर्व कृति पाहिली म्हणजे तिच्या कर्त्यास या कर्तबगारीबद्दल मुखांतून धन्यवाद निघाल्यावांचून राहत नाहीं. असो. वर्णन केलें तेवढें थोडेंच होणार आहे. करितां निदान साधेल त्यानें तरी असलीं कामें एक वेळ अवश्य पहावींच.

ह्या गोदींत जहाजांतून माल उतरविण्याकरितां व त्याच्यावर माल चढविण्याकरितां वाफेनें चालणाऱ्या प्रचंड याऱ्यांची योजना केलेली आहे. हें यारी नांवाचें यंत्र सुमारें ६०।७० फूट उंच असतें व अगदीं शेवटीं एका मनुष्यास चांगलेंसें बसतां येईल एवढीच वर जागा असते व तेथें हें यंत्र चालवितेवेळीं एक मनुष्य बसलेला असतो. यंत्राची सर्व योजना वरच केलेली असते. या यारीचें मुख वाटेल त्या दिशेकडे सहज फिरवितां येतें या यारीचे मुखास भले मोठेमोठे लोखंडी साखळदंड लाविलेले असतात. त्यांत वाटेल तो माल अडकवून जहाजांतून बाहेर काढतां येतो किंवा खालून जहाजांत भरतां येतो. ही यारी सुमारें प्रत्येक वेळीं धान्याच्या वीसपंचवीस गोणी सहज उचलते. या याऱ्यांचे समोरच माल ठेवण्याच्या मोठमोठ्या वखारी आहेत. ह्या वखारींत मालाचे ढीगचे ढीग पडलेले असतात. पोत्यांच्या राशी तर एवढ्या मोठ्या असतात कीं, त्यांना डोंगरांतील लहानशा टेकड्या ह्मटल्या तरी वावगें होणार नाहीं.

## व्हिक्टोरिया डॉक.

( २४ ) ही गोदी प्रिन्सेस डॉकचे शेजारींच बांधलेली आहे व हिची रचनाहि प्रिन्सेस डॉकप्रमाणेंच आहे. हींत सुमारें २० जहाजें राहूं शकतील अशी सोय केलेली आहे. ही गोदी बांधून काढण्यास सरासरी तीस लक्षांवर खर्च आलेला आहे ह्या व्हिक्टोरिया डॉकमध्यें यारी आदिकरून सर्व यंत्रें पहावयास मिळतात. प्रिन्सेस डॉक प्रमाणेंच ही गोदीहि पहाण्यालायक आहे.

## सासून डॉक.

( २५ ) मधल्या कुलाब्याजवळ ही गोदी असून, हींत निरंतर जहाजें व आगबोटी येत जात असतात. त्यांतून लाखों खंडीचा माल शहरांत येतो व बाहेरगांवीं जातो. येथें नित्य हजारों मनुष्यांची गडबड दृष्टीस पडते. तेणेंकरून नवीन मनुष्याच्या अंतःकरणांत सानंदाश्चर्य उत्पन्न होतें. बंदरावर एक कॉटनप्रेस आहे. एकंदरींत ह्या गोदीचीहि व्यवस्था फार उत्तम असून प्रेक्षणीय आहे.

## प्रांग्स लाईट हाऊस ( प्रांग्स नांवाचा दीपस्तंभ )

( २६ ) असल्या दीपस्तंभाचा दर्यावर्दी लोकांना फारच फार उपयोग होतो. ह्यापासून रात्रीं येणाऱ्या जहाजास बंदरांत सुरक्षितपणें शिरतां येतें व खडकापासून त्याचें संरक्षण करितां येतें. शिवाय शत्रूंचीं जहाजें आलीं तर, तीं फार लांबून दिसतात. व तीं दिसलीं ह्मणजे इकडे जय्यत तयारी करून ठेवण्यास बराच अवकाश सांपडतो.

हें लाईट हाऊस प्रांग्स नामक खडकाच्या पायथ्याशीं बांधलेलें आहे ह्मणून ह्यास **'प्रांग्स लाईट हाऊस'** असें नांव पडलें. ह्याचे आसपासची जमीन मैल सव्वा मैल अगदीं खडकाळ आहे. ह्या लाईट हाऊसचा मनोरा काळा, पांढरा व तांबडा असा रंगविलेला आहे. काळा रंग अगदीं तळास दिलेला आहे. तेणें करून पावसाळ्यांत अगर सकाळीं पाण्यावर जेव्हां दाट धुकें पसरलेलें असतें तेव्हां हा मनोरा स्पष्टपणें दिसतो. ह्या दीपस्तंभामध्यें एकंदर आठ खोल्या आहेत. कित्येकींत सामान ठेवितात व कित्येकींत मनुष्यें राहतात. ह्या दीपस्तंभाचे व्यवस्थेसाठीं येथें एक युरोपियन व पांच नेटिव्ह कामगार आहेत. हा कंदील कांचेचा असून त्यास आठ बाजू आहेत. व ह्याची एक प्रदक्षिणा व्हावयास ऐशीं सेकंद लागतात. ह्यामुळें त्याचा प्रकाश प्रत्येक बाजूस

दहा दहा सेकंदांनीं पडत असतो. ह्याची चौकट तोफेच्या धातु व तांबें मिळून केलेली असून तिजवर त्रिकोणाकृति कांचेचें तावदान असल्यामुळें त्यास विशेष चकाकी मारते. हा दीपस्तंभ पाण्याच्या सपाटीपासून अठरा फूट उंच आहे असें जहाजांत बसलेल्या लोकांस अठरा मैलांवरून दिसतें. सर्व जगांत हा दीपस्तंभ मोठा असून ह्यास एकंदर ६, २०,२५५ रुपये खर्च लागला आहे.

---

# प्रेक्षणीय पुतळे.

## महाराज्ञी व्हिक्टोरिया यांचा पुतळा.

( २७ ) हा पुतळा कोटांत एस्प्लेनेड रोड व मेयो रोड ह्यांच्या अगदीं टोंकावर आहे. हा महाराज्ञीचा पुतळा प्रख्यात आंग्लभौम शिल्पशास्त्री नोबल ह्यानें घडला असून, तो शुभ्र स्फटिकाचा बनविलेला आहे. हा पुतळा एका सुंदर खुर्चीवर बसविलेला असून तिच्या पाठीशीं तक्ये ठेवलेले आहेत व वर राजचिन्हांकित असें सुंदर कोरींव काम केलेलें मखर आहे. महाराज्ञीचे उजवे हातांत राजदंड असून डावे हातांत एक कमळ पुष्प आहे. राणीच्या पोषाखाचें काम इतकें प्रेक्षणीय केलें आहे कीं, तो केवळ कपडाच आहे असा प्रेक्षकांस साहाजिक भास उत्पन्न होतो.

ह्या पुतळ्यास एकंदर खर्च सुमारें एक लक्ष ऐशीं हजार रुपये आलेला असून, हा सर्व खर्च **माजी श्रीमंत खंडेराव गायकवाड सरकार, बडोदें** ह्यांनीं दिलेला आहे. हा पुतळा मुंबईमध्यें सर्वोत्तम असा असून, तो पहाणारास सर्व राजकीय चिन्हें पहावयास सांपडतात. एकंदरींत ह्या पुतळ्याचें काम फारच सुंदर असून तें प्रेक्षणीय आहे.

## प्रिन्स ऑफ वेल्सचा पुतळा ( सातवे एडवर्ड ).

( २८ ) हा पुतळा म्युझियम वेस्टजवळ एस्प्लेनेड रोड व फार्बस स्ट्रीट ह्यांच्यामध्यें अगदीं रस्त्यावरच आहे. ह्या पुतळ्यास एकंदर खर्च सवा लक्ष रुपये आलेला आहे. इ. स. १८७५-७६ सालीं प्रिन्स ऑफ वेल्स हे मुंबईस आले होते. त्यांचे स्मरणार्थ **सर आल्बर्ट ससून** ह्यांनीं तयार करविला. **माजी गव्हरनर सर रिचर्ड टेंपल** ह्यांनीं हा पुतळा इ० स० १८७९ सालीं उघडण्याचा मोठा समारंभ केला.

हा पुतळा एका उमद्या घोड्यावर बसविला असून त्यांचे हातांत एक तरवार आहे. त्यायोगें हा पुतळा फारच मनोहर दिसतो. अंगांत फिल्ड मार्शलचा पोषाख केलेला आहे. उजव्या हातांत टोपी धारण केलेली असून चौथऱ्याचे दोन्ही बाजूंस ओतींव कामांत दोन सुंदर देखावे दाखविले आहेत. त्यांपैकीं पहिला देखावा **प्रिन्स ऑफ वेल्स** हे गोदींतून बाहेर येत आहेत असा दाखविला आहे. व दुसरा देखावा मैदानांत लहान मुलांना मेजवानी दिली त्यावेळीं पारसी स्त्रियांनीं त्यांचेवर पुष्पवर्षाव करून आदरसत्कार केल्याचा दाखविला आहे. पश्चिम बाजूला माजी **गव्हरनर लार्ड नार्थब्रूक** ह्यांनीं एतद्देशीय संस्थानिकांबरोबर युवराजांची भेट करून दिली असा देखावा आहे. पूर्व बाजूला पारशी स्त्रिया आपल्या हातांत सुवासिक व सुंदर पुष्पमाळा घेऊन युवराजांच्या गळ्यांत धारण करण्याकरितां येत आहेत, व त्यांचे बरोबर इतर हिंदु, मुसलमान, पारशी वगैरे लोक येत आहेत असा सुंदर मनोवेधक देखावा दाखविला आहे. ह्या पुतळ्याचें काम फारच सफाईदार केलेलें असून तें प्रेक्षणीय आहे ह्यांत मुळींच संशय नाहीं.

## सर रिचर्ड टेंपल यांचा पुतळा.

( २९ ) हा पुतळा चर्चगेट स्टेशनानजीक मेयो रोडवर आहे. हे साहेब मुंबईस मागें एक प्रसिद्ध गव्हरनर होऊन गेले. ह्यांनीं इ. स. १८७७

ते १८८० पर्यंत गव्हरनराचें काम केलें. ह्यांचा पुतळा बसवावा म्हणून इ० स० १८८० सालामध्यें टाऊन हालांत एक जंगी जाहीर सभा भरली होती. त्या वेळीं कित्येक युरोपियन व पारशी लोकांनीं मिळून सुमारें वीस हजार रुपये वर्गणी गोळा केली. नंतर विलायतेंतील सुप्रसिद्ध कारागीर **मिस्टर बी. ब्रांक** ह्यांच्या हस्तें हा पुतळा घडविला व शुभ्र संगमरवरी दगडाचा चौकोनी चौथरा करून त्याजवर तो उभा केला आहे.

## नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांचा पुतळा.

( ३० ) हा पुतळा चर्चगेट स्टेशनानजीक अगदीं रस्त्यावरच आह. नामदार गोपाळ कृष्ण गोखले सी. आय. ई. हे एक हिंदुस्थानांत परम देशभक्त व मुत्सद्दी पुरूष होऊन गेले. हे मुळचे पुण्याचे रहिवाशी असून ह्यांचा जन्म ता. ९ माहे मे इ० स० १८६६ मध्यें झाला, व हे ता. १९ फेब्रुवारी १९१५ मध्यें मरण पावले. हे परम देशभक्त होऊन गेले म्हणून त्यांचे स्मरणार्थ हिंदुस्थानांतील प्रमुख प्रमुख लोकांनीं मिळून हा पुतळा स्थापन केला आहे. हा पुतळा शुभ्र संगमरवरी स्फटिकाचा घडविला असून त्यास एका दगडी चौथऱ्यावर उभा केला आहे. अंगावर शुभ्र उपवस्त्र धारण केलेलें असून डावे हातांत कागदांचें बंडल आहे; तसेंच डावे पायाजवळ तीन चार पुस्तकें एकांवर एक अशीं ठेविलीं आहेत अशा तऱ्हेचा सुंदर चित्ताकर्षक देखावा दाखविला आहे.एकंदरींत ह्या पुतळ्याचें काम एक वेळ अवश्य पहाण्यासारखें आहे.

## मार्किस कार्नवालीस व मार्किस वेलस्ली यांचे पुतळे.

( ३१ ) कोटांत टाऊन हॉलसमोर एल्फिन्स्टन सर्कल नांवाची एक बाग आहे. ह्या बागेंत मार्किस कार्नवालीस व मार्किस वेलस्ली ह्यांचे पुतळे ठेविले आहेत. पैकीं दुसऱ्या पुतळ्यास सुमारें पाऊण लाख रुपये खर्च झाले आहेत. हा पुतळा एका चौथऱ्यावर बसविला असून, त्याचे डावे हातांत एक पुस्तक आहे, व उजवे हातांत पेहलवानास बक्षीस देण्याकरितां

एक तोडा आहे. हा पेहलवान उजवे बाजूस उभा असून डाव्या बाजूस एक युरोपियन लेडी उभी आहे. पेहलवानाजवळ ढाल, तरवार, वगैरे हत्यारें असून तो गव्हरनर साहेबांकडे पहात आहे व लेडीचे हातांत टांक असून त्यानें ती ' Wisdom, Energy, Integrity ( चातुर्य, शौर्य, प्रामाणिकपणा ) अशीं अक्षरें लिहीत आहे असा देखावा आहे. पेहलवानाचे मागचे बाजूस सिंह व लेडीचे मागचे बाजूस वाघ ह्यांचे पुतळे बसविले आहेत. ह्या पेहलवानानें सिंह व वाघ जिवंत हातांत धरून आणल्यामळें गव्हरनर साहेबांनीं खुशी होऊन त्यास एक तोडा बक्षीस दिला असें सांगतात.

हा पुतळा मुंबईतील धनिक व्यापारी लोकांनीं मिळून बसविला आहे. चौथऱ्याचे पायथ्याशीं मुंबईतील धनिक व्यापाऱ्यांचे लहान लहान पुतळे व आसई येथील लढाईचा देखावा दाखविला आहे.

ह्या पुतळ्याचे डावे बाजूस अगदीं थोड्याशा अंतरावर मार्किस कार्नवालीस ह्यांचा पुतळा एका चौथऱ्यावर उभा केला असून, चौथऱ्याचे दोहों बाजूंस दोन युरोपियन लेड्यांचे पुतळे बसविले आहेत असा देखावा आहे.

---

# प्रसिद्ध हॉस्पिटलें.

## जे. जे. हॉस्पिटल.

( ३२ ) हें हॉस्पिटल परेल रोडवर बाबुला तळ्यानजीक आहे. हें हॉस्पिटल बांधून काढण्यासाठीं **सर जमसेटजी जिजीभाई बाटलीवाले** ह्यांनीं दिलेले एक लक्ष सत्तर हजार रुपये व सरकारनें दिलेले तीस हजार रुपये मिळून ह्या हॉस्पिटलास दोन लक्ष रुपये खर्च आलेले

आहे. ह्या हॉस्पिटलास बहुतेक रकम **सर जमसेटजी जिजी-भाई** ह्यांनीं दिली असल्यामुळें, त्यांचेच नांवानें हें हॉस्पिटल प्रसिद्ध आहे. त्यांचे नांवांतील पहिली इंग्रजी अक्षरें जे. जे. हीं असल्यामुळें ह्यास **जे. जे. हॉस्पिटल** असें ह्मणतात.

सदरहू हॉस्पिटलानें बरींचशी एकर जमीन व्यापिली असून, हींत सुमारें लहानमोठ्या चाळीस इमारती बांधलेल्या आहेत. ह्या हॉस्पिटल-मध्यें सुमारें पांचशें साडे पांचशें रोग्यांची राहण्याची सोय केली आहे. येथें नित्य सुमारें शें-सवाशें रोगी औषधी घेण्यास येत असून, रोज दहा पंधरा ऑपरेशन्स ( शस्त्रक्रिया ) होत असतात. ह्या हॉस्पिटलांत असणाऱ्या सर्व रोग्यांची व्यवस्था इतक्या उत्तम तऱ्हेनें ठेविली जाते कीं, तशी एकाद्या श्रीमंत मनुष्याच्या स्वतःच्या घरींदेखील ठेवाविली जात नसेल. ह्या हॉस्पिटलचा एकंदर दरमहाचा सर्व खर्च सुमारें तेहतीस चौतीस हजार रुपयेपर्यंत येत असतो.

ह्या हॉस्पिटलमध्यें पदार्थसंग्रहालयांत अनेक प्रकारचे गर्भ, गर्भाशयांत असलेलीं जुळीं व तिळीं मुलें, शिराचे कापलेले रोगग्रस्त भाग, मुतखडे वगैरे ठेवलेले आहेत. शिवाय शारिराच्या अवयवांची रचना व अवयवांची रोगग्रस्त स्थिति समजावी ह्मणून शाडू अथवा मेण यांचे बनविलेले नमुने ठेविलेले आहेत. दुसरी महत्वाची गोष्ट ह्मटली ह्मणजे शरिरांतील कोण-ताहि भाग स्पष्ट दिसण्याचें यंत्र येथें ठेवण्यांत आलें असून त्याचें नांव '**क्ष-किरण**' आहे. ह्या यंत्राची किंमत सुमारें पस्तीस हजार रुपये असून ह्याचे सहाय्यानें शरीरांतील एकंदर सर्व हाडें किंवा इतर अपारदर्शक पदार्थ आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणें स्पष्ट दिसतात; एवढेंच केवळ नाहीं तर त्यांचा फोटो देखील घेतां येतो. शरिरांत शिरलेली बंदुकीची गोळी, मुतखडा, मोडलेलें हाड हीं सर्व शरिरांत कोठें आहेत, कशा स्थितींत आहेत, याचें उत्तम ज्ञान या 'क्ष-किरण' नामक यंत्राच्या योगानें होतें.

ह्या हॉस्पिटलमध्यें रोगी आल्यावर त्यास कसलीहि काळजी राहत नाहीं. येथील रोग्यांना भेटावयाचें झाल्यास दिवसा केव्हांहि भेटण्याची मोकळीक असते.

## ग्रँट मेडिकल कॉलेज.

( १३ ) सदर्हू कॉलेज परेल रोडवर जे. जे. हास्पिटल यास लागूनच आहे. ह्या कॉलेजांत विद्यार्थ्यांना शास्त्रीय पद्धतीनें वैद्यकीचा व शस्त्रक्रियेचा अभ्यास फारच उत्तम तऱ्हेनें शिकविला जातो. येथील **डिसेक्शन हॉल** ह्मणजे प्रेतें फाडण्याची जागा अत्यंत प्रेक्षणीय आहे. जे. जे. हॉस्पिटलमध्यें येणाऱ्या भिकारी अथवा बिनवारशी रोग्यांपैकीं जे रोगी मरण पावतात व अर्थात त्यांची प्रेतें नेण्यास कोणीहि नातेवाईक अगर स्नेही मंडळी येत नाहींत; त्यांचीं प्रेतें ह्या कॉलेजांतील विद्यार्थ्यांना फाडण्याकरितां देतात. तेव्हां विद्यार्थी तीं प्रेतें फाडून शरीररचनेची माहिती करून घेतात कोणत्याहि रोग्याचें प्रेत फाडण्यापूर्वी त्याचे हृदयांत कॅरबॉलिक ॲसिड, सोमल व पारा वगैरे मिश्रणांची पिचकारी मारतात. त्यामुळें प्रेत कुजण्याची क्रिया बंद होते. जो भाग कापतात त्यावर पाण्याची तोटी सोडून तो उत्तम तऱ्हेनें धुऊन काढितात. त्यामुळें त्यास घाण मुळींच येत नाहीं. शिवाय प्रेतें फाडतांना तीं ठेवण्याला लांकडाचीं टेबलें न ठेवितां मुद्दाम कांचेचीं टेबलें ठेवलेलीं आहेत, कांचेचीं टेबलें साफ व चिकण असतात. तीं धुतलीं ह्मणजे ताबडतोब अगदीं स्वच्छ होतात. त्यामुळें घाण राहण्याला किंवा तीं कुजण्याला मुळींच जागा नसते. प्रत्येक टेबलाजवळ सुमारें ४।५ विद्यार्थी उभे राहून टेबलावरील प्रेत फाडून शारीरशास्त्राचा अभ्यास करीत असतात. येणें करून ते शस्त्रक्रियेंत अगदीं प्रवीण होत असतात. ह्या कॉलेजांतून पसार झालेल्या विद्यार्थ्यांस '**एल्. एम्. ॲन्ड एस्.**' ही पदवी देतात. ह्या कॉलेजांतील अति श्रेष्ठ पदवी झटली ह्मणजे '**एम्. डी.**' ही होय.

ह्या कॉलेजाचे समोर इ. स. १८६२ सालीं सर **जमसेटजी जीजी-भाई** ह्यांचा पुतळा त्यांचे **चिरंजीव व पत्नी रतनबाई** ह्या उभयतांनीं बसविला आहे.

## गोकुळदास तेजपाळ हॉस्पिटल.

( ३४ ) हें हॉस्पिटल धोबी तलावानजीक कर्नाक रोडवर आहे. ह्या हॉस्पिटलची इमारत दगडी बांधलेली असून हीस एकंदर ३, ६७, ४६५ रुपये खर्च आलेला आहे. त्यांपैकीं दीड लक्ष रुपये **मरहूम शेठ गोकुळदास तेजपाळ** यांनीं दिले आहेत. ह्या हॉस्पिटलमध्यें सुमारें १२५ रोग्यांस राहण्याची सोय केलेली आहे.

## पेस्तमजी होरमसजी कामा हॉस्पिटल

( ३५ ) हें हॉस्पिटल मैदानासमोर क्रुकशांक रोडवर सेंट झेविअर कॉलेजचे अगदीं शेजारीं असून, तें बांधविण्याचा सर्व खर्च **पेस्तमजी होरमसजी कामा** ह्या सद्गृहस्थानें दिला असल्यामुळें त्यचेंच नांव देण्यांत आलें आहे. ह्या हॉस्पिटलच्या इमारतीच्या पायाची कोनाशिला ड्यूक ऑफ कॅनाट व स्ट्राथर्न ह्यांच्याहस्तें तारीख २२ नोवेंबर इ. स. १८८३ रोजीं बसविण्यांत आली. तसेंच ह्या इमारतीचा नकाशा **खानबहादूर मंचरजी कावसजी मरझबान** सिव्हिल एंजिनिअरांचे इंस्टिट्यूटचे ॲसोशिएट मेंबर ह्यांनीं तयार करून दिला व त्यांचेच देखरेखीखालीं ही इमारत बांधविण्यांत आली. हें हॉस्पिटल संपूर्ण तयार होतांच **नामदार राईट ऑनरेबल लॉर्ड रे साहेब**, मुंबईचे गव्हरनर यांनीं ता. ३० माहे जुलै इ. स. १८८६ रोजीं यथाविधि उघडण्याचा समारंभ पार पाडला.

ह्या हॉस्पिटलमध्यें फक्त स्त्रिया व मुलें यांनाच धर्मार्थ औषधोपचार केला जातो. येथील मुख्य डाक्टरीण एक युरोपिअन लेडी असून, ह्या हॉस्पिटलमध्यें सुमारें ५५ रोग्यांस राहण्याची सोय केली आहे.

ह्या हॉस्पिटलास एक 'ट्रेनिंग स्कूल फार नर्सिंग व मिड वाईफरी' करितां जोडण्यांत आलें आहे व त्यांत बालरोग चिकित्सेसंबंधीं व सुईण कामासंबंधीं शिक्षण देण्यांत येत असतें. हॉस्पिटल व लेक्चर रूम मिळून फक्त २२ प्युपिल नर्सिस राहण्याची सोय केलेली आहे. ह्या प्युपिल नर्सिसचा खर्च **श्रीमंत गायकवाड सरकार, बडोदें** यांचेकडून मिळत असतो.

### सर कावसजी जहांगीर अपृथालमिक हॉस्पिटल.

( ३६ ) सदर्हू हॉस्पिटल **सर कावसजी जहांगीर रेडिमनी** ह्यांनीं बाबुला तळ्याजवळ बांधिलें आहे. ह्या हॉस्पिटलमध्यें सर्व प्रकारचे नेत्र-रोग दुरुस्त केले जातात. येथें नित्य सरकारी **सिव्हिल सर्जन** येऊन रोग्यांस औषधोपचार करीत असतो. येथेंहि रोग्यांची निजण्याची वगैरे व्यवस्था जे. जे. हॉस्पिटलप्रमाणें उत्तम प्रकारें ठेविली जाते. येथें रोग्याचे डोळ्यांत मोतीबिंदु असल्यास, तो रोग्यास समजूं न देतां फारच चलाखीनें व चातुर्यानें डाक्टर लोक काढीत असतात.

---

## प्रसिद्ध इमारती.

---

### व्हिक्टोरिया गार्डन ( राणीचा बाग )
### व
### आल्बर्ट म्युझियम ( पदार्थसंग्रहालय )

( ३७ ) **राणीचा बाग व पदार्थसंग्रहालय**—हें दर रविवारीं मुंबई टाईम सकाळीं ८ ते सायंकाळीं ५ वाजेपर्यंत उघडें ठेवीत असतात; तसेंच सोमवार ते शनिवार पावेतों सकाळीं १० ते सायंकाळीं ५ वाजे-पर्यंत उघडें ठेवण्यांत येत असतें.

**पदार्थसंग्रहालय**—दर सोमवारीं बंद ठेवण्यांत येत असतें. परेल रोडवर भायखळा स्टेशनानजीक जो ट्रामगाड्या ठेवण्याचा तबेला आहे, त्याचेसमोरच राणीचा बाग व पदार्थसंग्रहालय आहे. ह्या बागेचे मुख्य दरवाज्याजवळ एक मोठा उंच मनोरा असून त्यावर एक घड्याळ बसविलें आहे. हा मनोरा **डेविड ससून** नामक एका यहुदी गृहस्थानें बांधविला आहे, ह्या मनोऱ्यापुढें एक मोठी सुंदर, चित्रविचित्र व सुशोभित इमारत आहे. ह्या इमारतीसच पदार्थसंग्रहालय असें म्हणतात. ह्या पदार्थालयाची स्थापना माजी गव्हरनर **लॉर्ड एल्फिन्स्टन** ह्यांनीं केली आहे. येथें बहुतेक सर्व निर्जीव पशुपक्ष्यादिकांचा व इतर रमणीय वस्तूंचा भरपूर संग्रह एके ठिकाणीं केलेला आहे. हें पदार्थसंग्रहालय व राणीचा बाग तयार करण्यास सुमारें दहा बारा लाख रुपये खर्च आलेला आहे.

**मनुष्यांची गणती करण्याचें यंत्र**—बागेच्या व पदार्थसंग्रहालयाच्या मुख्य दरवाज्याजवळ एक फिरतें कळसुत्रीं यंत्र बसविलेलें आहे. तें यंत्र फिरवीत फिरवीत मनुष्यांस आंत जावें लागतें. ह्या यंत्रावरून बागेमध्यें व पदार्थ संग्रहालयांमध्यें किती मनुष्यें येऊन गेलीं हें समजतें.

**राणीचा बाग**—हा बाग मुद्दाम सार्वजनिक लोकांच्या उपयोगासाठीं तयार करविला असून, हल्लीं ह्याची सर्वतोपरी व्यवस्था ठेवण्याचें काम म्युनिसिपालिटी पहात आहे. ह्या बागेबद्दल म्युनिसिपालिटीस सुमारें एक हजार रुपयांचे वर खर्च येत असतो. ह्या बागेंत सिंह, वाघ, हत्ती, उंट, लांडगे, अस्वलें, हरणें, माकडें, कांसवें, वनगाई वगैरे बहुतेक जातींचे सुमारें चारपांचशें जिवंत प्राणी ठेविले आहेत. ह्या सर्व प्राण्यांसाठीं बागेंत, ठिकठिकाणीं लोखंडी पिंजरे तयार करवून, आंत ज्या त्या प्राण्यासाठीं योग्य अशा सोयी काढविण्यांत आल्या आहेत. बागेंत, फिरण्यासाठीं बऱ्याच सडका काढलेल्या असून मधून मधून नागमोडी रस्तेहि काढलेले आहेत. ह्या बागेंत, बहुतेक सर्व प्रकारचीं झाडें व वनस्पति लाविलीं असून,

त्यांची संख्या जवळ जवळ दोन हजारांवर आहे. प्रत्येक झाडावर ज्याचे त्याचे नांवाची लहानशी पाटी लाविली आहे. एके ठिकाणीं एक लहानसा नदीचा टुमदार देखावा दाखविला असून त्या नदीवरून जाण्यायेण्यासाठीं लांकडी पूल बांधून काढिला आहे.

कोणत्याहि इसमास ह्या बागेंतील हत्तीवर किंवा उंटावर बसून बागेंत फिरावयाचें झाल्यास, त्यानें त्यांची फी भरल्यास फिरतां येतें. हत्तीवर बसून फिरण्याची फी प्रत्येक मनुष्यास दोन रुपये व दहा वर्षांचे आंतील मुलास आठ आणे द्यावी लागते व उंटावर बसून फिरण्याची फी प्रत्येक मनुष्यास दोन रुपये व दहा वर्षांचे आंतील एक रुपया पडते. हत्तीवर किंवा उंटावर बसून बागेंत फिरण्याचा टाईम दुपारीं तीन ते साडेपांच वाजेपर्यंत ठेविला आहे. बाग उघडा असतांना कोणत्याहि वेळीं बसावयाचें झाल्यास हत्तीबद्दल दर तासास पांच रुपये व अर्ध्या तासास अडीच रुपये पडतात. तसेंच उंटाबद्दल दर तासास दोन रुपये व अर्ध्या तासास एक रुपया पडतो.

एकंदरींत हा बाग फारच फार रमणीय असून चित्तास आल्हाद देणारा आहे. ह्यांत मुळींच शंका नाहीं. ह्याशिवाय मुंबईत ठिकठिकाणीं लहानमोठे कांहीं बाग आहेत त्यांचीं नांवें खालीं दिलीं आहेतः—हँगिंग गार्डन, मलबार हिल गार्डन, ब्याकबे गार्डन, एल्फिन्स्टन सर्कल गार्डन, युनिव्हरसिटी गार्डन, हार्नबी रोड गार्डन, फाकलंड रोड गार्डन, नार्थब्रुक गार्डन वगैरे बाग आहेत.

**( ३८ ) आल्बर्ट पदार्थ संग्रहालय**—ह्या पदार्थसंग्रहालयांत शिरतांना कांहीं दिवसांपूर्वीं पादत्राण बाहेर ठेवावें लागत असत. परंतु हल्लीं तशी अट नाहीं, मात्र छत्री किंवा काठी असल्यास ती दरवाज्यावर असलेल्या शिपायाच्या स्वाधीन करून द्यावी. पदार्थसंग्रहालय पाहून झाल्यावर परत जातेवेळीं आपली ठेवलेली छत्री किंवा काठी आपणास

परत मिळावी ह्यासाठीं ह्या शिपायाजवळ प्रत्येकीं एकाच नंबराचे टिनाचे बनविलेले गोलाकार असे दोन बिल्ले असतात. त्यांपैकीं तो एक आपणास देतो व दुसरा आपण दिलेल्या छत्रीस किंवा काठीस अडकवितो. आपणास दिलेला बिल्ला आपण जवळ ठेवावा व पदार्थसंग्रहालय पाहून झाल्यावर परत जातेवेळीं त्या शिपायास तो बिल्ला देऊन आपण ठेवलेली वस्तु परत घ्यावी.

ह्या पदार्थसंग्रहालयांत समोरच जो एक पुतळा स्थापन केलेला आहे तो **प्रिन्स कान्सर्ट आल्बर्ट** याचा असून, हा मोठा मसलती, कार्यधुरंधर, ज्ञानाचा सागर, विद्येचा निरलस पुरस्कर्ता व शांतीचा दृढमित्र होता. हें स्मारक **दाऊद ससून** ह्यांनीं इ. स. १८६४ मध्यें उभारलें आहे. शिवाय येथें वनचर पशु, पक्षी, सर्प इत्यादि निर्जीव प्राणी अशा तऱ्हेनें, व्यवस्थेनें व योग्य स्थळीं देखाव्यासह ठेविले आहेत कीं, जणूं काय ते जिवंतच आहेत असा प्रेक्षकांस भास होतो. वरील मजल्यावर जहाजें, तारवें, सर्व प्रकारचीं वाद्यें, शेतकी हत्यारें, लढाऊ शस्त्रास्त्रें वगैरे मनोवेधक व प्रेक्षणीय अशा अनेक वस्तूंचा संग्रह केलेला आहे. तसेंच अशोकवनांत बसलेली सीता, धृतराष्ट्राचा दरबार, दशावतार, कारखाने, मुंबई बेटाचे नकाशे वगैरे वगैरे पुष्कळच चित्ताकर्षक देखावे अगदीं हुबेहुब दाखविले आहेत. इमारतीचे स्तंभांना मधून मधून सोनेरी मुलामा दिला असल्यामुळें, ही इमारत फारच सुशोभित दिसते.

एकंदरींत हें पदार्थसंग्रहालय इतकें चित्ताकर्षक आहे कीं, येथें कसाहि दुःखी मनुष्य आला तर त्यास आपल्या दुःखाचा थोडा वेळ तरी विसर पडल्यावांचून केव्हांहि रहाणार नाहीं.

## प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियम ( पदार्थसंग्रहालय ).

( ३३ ) हें पदार्थसंग्रहालय कोटांत एस्प्लेनेड रोड, रॉम्पार्ट रोड व ॲपोलो स्ट्रीट ह्यांचे मध्यभागीं आहे. ह्या पदार्थसंग्रहालयाचे पुढें एक

लहानसा बाग आहे. व त्या बागेंत **युवराज जार्ज फ्रेडरिक अर्नेस्ट आल्बर्ट** यांचा पुतळा स्थापन केलेला आहे. हा पुतळा मुंबईतील प्रसिद्ध गृहस्थ **सर ससून डेव्हिड नाईट** यांनीं इ० स० १९०५-०६ सालामध्यें **युवराज जार्ज फ्रेडरिक अर्नेस्ट आल्बर्ट** ( हिंदुस्थानचे भावी राजपुत्र ) हे मुंबईस आले होते त्या वेळेस त्यांच्या स्मरणार्थ नजर केला आहे.

हा पदार्थसंग्रहालय पहाण्यास आंत शिरतांना आपली छत्री किंवा काठी तेथें कामावर असलेल्या शिपायाचे स्वाधीन करावी व त्याबद्दल तो एक बिल्ला देतो तो घेऊन नंतर आंत जावें. ह्या पदार्थसंग्रहालयांतील तळमजल्यावरील गोलार्धांत मध्यभागीं एक कारंजें असून त्याचे आजुबाजूस युरोपिअन स्त्रियांचे निरनिराळ्या फॅशनचे प्रेक्षणीय असे कांहीं पुतळे ठेविले असून **नेपोलिअन बोनापार्ट** यांचा एक पुतळा ठेविला आहे. तसेंच पूर्वेकडील नं० १—२ चे ग्यालरींत पुरातन देवादिकांच्या मूर्तींचा संग्रह केलेला असून शिवाय ताम्रलेख, गुजराथेंतील जैन देवळाचा एक लांकडी सुंदर कोरींव सभामंडप, एका देवालयांतील हत्तीवरील पितळी दीपावली इत्यादि अनेक पदार्थ ठेविले आहेत. पश्चिमेकडील नं० १—२ चे ग्यालरींत वनचर पशु, पक्षी, पाकोळ्या, पतंग वगैरे निर्जीव प्राणी अशा तऱ्हेनें व व्यवस्थेनें ठेविले आहेत कीं, जणूं काय ते जिवंतच आहेत असा भास होतो.

तळमजला पाहूत होतांच समोरील पायऱ्या चढून गेल्यावर समोरचे ग्यालरींत जैन लोकांचा फार पुरातनकाळचा वस्तुसंग्रह ठेविलेला आहे तो पाहून पहिल्या मजल्यावर जावें.

पहिल्या मजल्यावर पूर्वेकडील नं० १ चे ग्यालरींत बौद्ध देवतांचे पुतळे ठेविले असून आरबी व पराशियन भाषेंतील पुस्तकांचा संग्रह केलेला आहे. नं० २ चे ग्यालरींत शिलालेख व मोंगल वगैरे घराण्यांतील निरनिराळीं नाणीं ठेविलीं आहेत. दक्षिणेकडील बाजूस ऑफिसें आहेत.

पश्चिमेकडील ग्यालरींत मोठमोठ्या नद्यांतील निरनिराळया जातीचे मगर, विषारी सर्प, कांसवें, बेडूक व निरनिराळ्या जातींच्या मासोळया वगैरे निर्जीव प्राणी टापटिपीनें ठेविले आहेत. ह्या ग्यालरींत १९॥ फूट लांबीचा व २०० पौंड वजनाचा असा एक निर्जीव सर्प आहे. हा सर्प **एच. एच. दी महाराजा ऑफ कोचबिहार** यांनीं मारलेला असून, त्यांनीं तो ह्या पदार्थसंग्रहालयांत ठेवण्यासाठीं नजर केला आहे. उत्तरेकडील बाजूस नकशी काम केलेल्या दगडांचा संग्रह केलेला आहे.

दुसऱ्या मजल्यावर पश्चिमेकडील बाजूस नं० १ चे ग्यालरीमध्यें युरोपिअन लोकांचे व समुद्र, नद्या इत्यादिकांच्या देखाव्याचे मोठमोठे सोनेरी फ्रेमी बसविलेले सुंदर फोटो आहेत. ग्यालरी नं० २ मध्यें कपड्यावर केलेल्या नकशी कामाचे अनेक नमुने व काश्मीर येथील शाली ठेविल्या आहेत. उत्तरेकडील बाजूस नं० ३ चे ग्यालरींत नकशी काम केलेलीं चिनी मातीचीं अनेक भांडीं, हिंदु लोकांच्या वेगवेगळया देवतांचे पुतळे वगैरे अनेक प्रेक्षणीय वस्तूंचा संग्रह केलेला आहे. पूर्वेकडील ग्यालरी नं० ४ मध्यें सातारा येथील सिंहासन, नाना फडणवीस यांची रेशमी सतरंजी, नानतऱ्हेचीं अनेक हत्यारें, मोंगल घराण्यांतील व इतर चित्रें यांचा भरपूर संग्रह आहे. नं० ५ चे ग्यालरीमध्यें निरनिराळया देखाव्याचे सुंदर फोटो ठेविले आहेत. दक्षिणेकडील बाजूस ग्यालरी नं० ६ मध्यें लढाऊ हत्यारें व सातारा दरबारचा गालिचा वगैरे मराठी राज्यांतील राजकीय कपडे ठेविले आहेत.

ह्याच मजल्यावरील गोलार्धांत नं० १ चे कपाटांत पेशवाईतील वस्त्रें ठेविलीं आहेत. नं० २ चे कपाटांत सिंधचे आमिराचा जरीकोट व साताऱ्याचे राजाचा शेला वगैरे कपडे आहेत. नं० ३ चे कपाटांत शिवाजी महाराजांचा १८ पौंड वजनाचा गरम कोट व नाना फडणवीस यांचा शुभ्र मलमलचा १ पौंड वजनाचा झगा ठेविला आहे. नं० ५ व ६ चे

कपाटांत मुंबईचे समुद्रांतील निरनिराळा वस्तुसंग्रह केलेला आहे. नं० ७ चे कपाटांत सातारा येथील जरतारी मंदिल ठेवलेला आहे. तो १६० फूट लांब असून, त्याचें वजन २। पौंड आहे. नं. ८ चे कपाटांत शिवाजी महाराजांचीं वाघनखें, कांहीं हिरे व हिरे जडलेली एक डबी ठेविली आहे. शिवाय नाना फडणवीस यांचा ५० फूट लांबीचा व १॥ पौंड वजनाचा एक मंदिल आहे.

एकंदरींत हें पदार्थसंग्रहालय अत्यंत प्रेक्षणीय आहे.

## हायकोर्ट.

( ४० ) हायकोर्ट कोटांत राजाबाई टॉवर नजीक असून, ह्या हायकोर्टाची इमारत फारच मोठी आहे. हीस एकंदर चार मजले असून त्यांपैकीं पहिल्या व तिसऱ्या मजल्यावर हायकोर्टाचीं कित्येक ऑफिसें आहेत. दुसऱ्या मजल्यावर एकंदर सहा न्यायकोर्टें आहेत. व चवथ्या मजल्यावर रेकार्डरूम आहे. येथें फक्त महत्वाचीं कागदपत्रें ठेवीत असतात. खालीं तळमजल्याला मुख्य जिन्याजवळ मोठमोठे दोन दिवाणखाने काढलेले आहेत. त्यांपैकीं एका दिवाणखान्यांत गुन्हेगार कैद्यांना ठेवीत असतात. व दुसऱ्या दिवाणखान्यांत कोर्टाचा खाजगी छापखाना आहे. ह्या इमारतीच्या पूर्वेकडील भागांत दोहोंबाजूस दोन जिने आहेत. ह्यांवरून वर गेलें असतां मनुष्य थेट कोर्टांत जातो. कोर्टाच्या व ग्यालरीच्या जमिनीवर एक प्रकारच्या कौलाची फरसबंदी केलेली आहे. व इतर खोल्यांत इटाली दगडांची फरसबंदी केलेली आहे. ह्या इमारतीचा बाह्य देखावा फारच सुंदर दिसतो. खालीं तळमजल्यावर इतर अनेक ऑफिसें काढलेलीं असून कित्येक दालनें बॅरिस्टर लोकांस भाड्यानें दिलेलीं आहेत. ह्या इमारतीस सुमारें साडे सोळा लाख रुपये खर्च झालेला आहे.

एकंदरींत हायकोर्ट अगदीं पाहण्यासारखें असून, तें सर्वांना पाहण्याची पूर्ण मोकळीक आहे. मात्र गोंगाट करूं नये.

## स्माल कॉज कोर्ट.

( ४१ ) हें कोर्ट धोबीतलावानजीक कर्नाक रोडवर आहे. ह्या कोर्टाचे इमारतींत पहिल्या मजल्यावर फक्त ऑफिसें आहेत. दुसऱ्या व तिसऱ्या मजल्यावर एकंदर सहा न्यायकोर्टें आहेत. त्यांपैकीं दुसऱ्या मजल्यावर तीन न्यायकोर्टें असून एक प्लिडर्सरूम आहे व तिसऱ्या मजल्यावरही तीन न्यायकोर्टें असून एक लायब्ररी आहे. चौथ्या मजल्यावर कॅश डिपार्टमेन्ट व एक्झीक्युशन डिपार्टमेन्ट आहे.

ह्या कोर्टांत फक्त एक हजार रुपयापर्यंत फिर्यादी घेतल्या जातात. ह्या कोर्टांत विशेषेंकरून मारवाडी व वाणी ह्या लोकांचीच विशेष गर्दी असते. ही इमारतहि साधारण बरीच मोठी असून प्रेक्षणीय आहे. पाहण्याची सर्वत्रांस मोकळीक आहे.

## राजाबाई टॉवर व युनिव्हरसिटी लायब्ररी.

( ४२ ) ह्या टॉवरवर जावयाची फी प्रत्येक मनुष्यास दोन आणे ठेवलेली आहे. सबब कोणांसहि ह्या टॉवरवर जावयाचें असल्यास ह्या इमारतीचे तळमजल्यावरील दिवाणखान्यांत एक ऑफिस आहे. त्या ऑफिसांत जाऊन फी भरून द्यावी. फी भरल्यावर येथें एक नोंद्‌बूक ठेवलेलें आहे. त्यांत आपले नांवाची सही करून द्यावी. सही केल्यावर एक शिपाई आपणास टॉवरवर जाण्याचा जिना दाखवून देतो.

ही इमारत हायकोर्टानजीकच आहे. ह्या इमारतीस तळमजल्यावर दोन दिवाणखाने काढलेले आहेत. पश्चिमबाजूला एक अतिशय उंच मनोरा आहे. दोहों बाजूस दोन वर्तुळाकार जिने आहेत. वरील मजल्यावर लायब्ररी व रिडिंग रूम आहे. हीं दोन्हीं एकाच दिवाणखान्यांत आहेत. ह्याच इमारतींत ‘ लॉ लेक्चर्स ’ होत असतात. येथेंच युनिव्हरसिटी ऑफिस आहे.

राजाबाई टॉवर युनिव्हरसिटीला लागूनच पश्चिमेस असून २८० फूट उंच आहे. ह्या टॉवरखालीं उभें राहून वर पहावयाचें झाल्यास डोकींतील टोपी अगर पागोटें ह्यास हात लाविल्यावांचून पहावत नाहीं. तसेंच मनोऱ्यावर जाऊन खालीं पाहिल्यास मोठमोठ्या हवेल्या व मनुष्यें अगदींच चिमुकलीं दिसतात.

ह्या मनोऱ्यावर जाण्यास एकंदर २८२ पायऱ्या चढून जाव्या लागतात. ह्या मनोऱ्याचा जिना वर्तुळाकार असून, आंत प्रकाश पडावा म्हणून ठिकठिकाणीं खिडक्या ठेविल्या आहेत. तरीहि एक दोन ठिकाणीं बराच अंधार पडतो. पायऱ्या फारच अरुंद असून जागाहि थोडीशी आहे. त्यामुळें पायऱ्या चढतांना जीव अगदीं थकून जातो. जमिनीपासून १०९ पायऱ्या चढलें म्हणजे एक टप्पा पुरा होतो. नंतर पुनः ४७ चढलें म्हणजे दुसरा टप्पा पुरा होतो. तेथून पुनः २४ पायऱ्या चढलें म्हणजे तिसरा टप्पा पुरा होतो. येथून घड्याळांना सुरुवात होते. आणखी ५० पायऱ्या चढून गेलें म्हणजे घड्याळांचीं यंत्रें दिसतात. पुनः ५२ पायऱ्या चढून गेलें म्हणजे वर जाण्यास एक लहानसा कांचेचा दरवाजा लागतो. तो चढून वर जावें. येथून शहराचा देखावा फारच चित्ताकर्षक दिसतो. समुद्र तर कित्येक कोसपर्यंत लांब दृष्टीस पडतो. येथून वर घुमट असून त्याची उंची ५२ फूट आहे, व त्याच्या टोंकावर एक वाटोळा दगड बसविला आहे. ह्या इमारतीचें एवढें मोठें अवाढव्य काम केलें तरी एकाहि मनुष्याचे जिवास धक्का पोहोंचला नाहीं ही मोठीच आश्चर्याची गोष्ट समजली पाहिजे.

ह्या मनोऱ्यावर चौबाजूंस चार घड्याळें बसविलीं आहेत. तीं बरींच मोठीं असल्यामुळें फार लांबून दिसतात. रात्रींच्या प्रसंगीं पाहणारास वेळ समजावा म्हणून आंत ग्यासच्या दिव्यांची योजना केलेली आहे. ह्या घड्याळास मोठमोठ्या जबरदस्त घंटा आहेत. त्या प्रत्येक पंधरा मिनि-

टांनीं वाजतात, व तास झाला म्हणजे मोठ्यानें ठोके पडतात. हे ठोके यंत्राच्या सहाय्यानें पडतात. केव्हां केव्हां या घड्याळांत बाजाहि वाजत असतो. मनोऱ्यावर किंवा मनोऱ्याखालीं असतांना जर घड्याळाचे ठोके पडले तर अशी भीति वाटते कीं, जणूं काय मनोरा कोसळून खालीं पडतो असा भास होतो. ह्या घड्याळास एकंदर सुमारें तीस हजार रुपये खर्च लागला आहे.

राजाबाई टॉवर व लायब्ररी मिळून ह्या इमारतीस एकंदर ५, ४७, ७०३ रुपये खर्च आलेला आहे. त्यांपैकीं **रा. रा. प्रेमचंद रायचंद शेठ** ह्यांनीं चार लक्ष रुपये आपल्या **राजाबाई** नामक मातोश्रीच्या स्मरणार्थ मनोरा बांधण्यासाठीं दिले. ह्याच कारणास्तव ह्यास ‘ **राजाबाई टॉवर** ’ असें नांव देण्यांत आलें आहे.

## युनिव्हरसिटी सिनेट हॉल.

( ४३ ) ही इमारत राजाबाई टॉवर नजीक असून हिचें बांधकाम अत्यंत प्रेक्षणीय असें केलेलें आहे. ह्या इमारतीस एकंदर पांच लक्ष रुपये खर्च आला असून त्यांपैकीं एक लक्ष रुपये हीं इमारत बांधतेवेळीं **सर कावसजी जहांगीर रेडिमनी नाईट सी. एस्. आय.** ह्यांनीं बक्षीस दिले म्हणून हिला ‘ **सर कावसजी जहांगीर युनिव्हरसिटी हॉल** ’ असेंहि म्हणतात. ह्या इमारतीचे पुढें सदर्हू गृहस्थाचा पुतळा उभा केलेला आहे. ह्या इमारतींत प्रवेश करतांना दोहों बाजूस दोन जिने असून त्यांजवर अष्टकोणाकृति मनोरे काढलेले आहेत. ह्या इमारतीचा भुईतट नानाप्रकारच्या रंगीबेरंगी दगडांनीं सुशोभित केलेला आहे. ही इमारत लहानशीच पण टुमदार असून हिचा देखावा फारच मनोवेधक दिसतो. येथेंच प्रतिवर्षीं निरनिराळ्या परिक्षेंत उत्तीर्ण झालेल्या उमेदवारांस **चान्सलर** पदवी देत असतात त्या वेळीं सर्व ग्रॅज्युएट लोक जमत असतात.

## न्यू सेक्रेटरीएट ऑफिस.

( ४४ ) हें ऑफिस पूर्वेकडून होप स्ट्रीट व पश्चिमेकडून मेयो रोड ( ब्याकबे रोड ) ह्या दोन रस्त्यावर असून युनिव्हरसिटी हॉल नजीक आहे. ह्या आफिसापुढें बरीच जागा मोकळी आहे. पाठीमागच्या बाजूला दोन उपगृहें आहेत. हें ऑफिस बरेंच मोठें असून ह्याची लांबी दक्षिणोत्तर विशेष आहे. ह्या ऑफिसांत गव्हरनर साहेबांचें विराजमान होण्याचें स्थान आहे. ह्यास '**कौंसिल हॉल**' असें नांव आहे. हें कौन्सील हॉल पहिल्या मजल्यावर असून वर्षांतून दोन तीन वेळां ह्या ठिकाणीं गव्हरनर साहेबांची '**लेव्ही**' भरत असते. ज्या वेळीं **गव्हरनर साहेब** ह्या ऑफिसांत असतात त्या वेळीं ऑफिसच्या टॉवरच्या शेंड्यावर निशाण फडकविण्यांत येत असतें. ह्या ऑफिसांत सरकारी दुसरीं अनेक ऑफिसें आहेत. ह्या इमारतीस एकंदर १२,६०,८४४ रुपये खर्च आलेला आहे.

हें ऑफिस पहाण्याची सर्वांना मोकळीक आहे. मात्र गोंगाट करूं नये.

## डॉक यार्ड फॅक्टरी.

( ४५ ) हा कारखाना ॲपोलो स्ट्रीटवर प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियम पासून अगदीं नजीक आहे. ह्या कारखान्यांत मोठमोठीं जहाजें, आगबोटी व होड्या दुरुस्त होत असतात. येथें जीं अनेक यंत्रें आहेत त्या सर्वांत वाफेनें चालणारा हातोडा अत्यंत प्रेक्षणीय आहे. हा हातोडा सुमारें एक फूट जाडीचा असून, त्याचें सामर्थ्य इतकें बलवत्तर आहे कीं, शेंकडों खंडी वजनाचा लोखंडी घन जोरानें आपटला असतां त्याचा जेवढा दाब पडेल तेवढा दाब ह्याचा वाफेच्या यंत्रानें पडतो. ह्याच्याखालीं एकाद्या हत्तीच्या पायाच्या आकाराएवढा लोखंडी खांब तापवून लाल करून ठेविला तर तो ३।४ मिनिटांत सहज चपटा होऊन जातो. तसेंच वाफेनें चालणाऱ्या पोलादी कातरीहि अशा जंगी व जलद आहेत कीं, तळहाताच्या जाडीचे लोखंडाचे पत्रे ह्या कातरी सहज कापून टाकतात.

हा कारखाना पहावयाचा झाल्यास दरवाज्यावर असलेल्यां कॉमगाराची परवानगी घेऊन आंत जावें.

## टाऊन हॉल.

( ४६ ) ही प्रसिद्ध सार्वजनिक इमारत एल्फिन्स्टन सर्कलच्या पूर्वेस आहे. ह्या इमारतींत प्रवेश करतांना प्रथम पायऱ्या लागतात. ही इमारत मोठी भव्य व प्रेक्षणीय अशी बांधलेली असून हीस एकंदर पाच लाख रुपये खर्च आलेला आहे. ह्या इमारतीचें बांधकाम इ० स० १८२१ मध्यें सुरु होऊन तें इ० स० १८३३ मध्यें पुरें करण्यांत आलें. ही इमारत दोन मजली असून, तळमजल्यामर उत्तरेस **क्वार्टर मास्तर जनरल** यांचें ऑफिस व दक्षिणेस **सुपरिंटेंडेंट ऑफ स्टेशनरी** यांचें ऑफिस व मुंबईचे **बेंच ऑफ दी जस्टीस** ह्यांचें आफिस आहे. वरच्या मजल्यावर उत्तरेस **बाम्बे ब्रँच ऑफ दी रॉयल एशियाटिक सोसायटी ऑफ ग्रेटब्रिटन व आयर्लंड** ह्या मंडळीची लायब्ररी व रिडिंग रूम असून दक्षिणेस **सर्जन जनरलचें ऑफिस** आहे. ह्या इमारतींत मध्यभागीं एक मोठा दिवाणखाना आहे. ह्या दिवाणखान्यांत सार्वजनिक कामाचा उहापोह करण्यासाठीं मोठमोठ्या सभा भरविण्यांत येत असतात. तसेंच मॅट्रिक्युलेशन वगैरे परिक्षाकरितांहि ह्याचा उपयोग करविण्यांत येत असतो.

ह्या दिवाणखान्याचे दक्षिणेस **माजी गव्हरनर मॉस्टुअर्ट एल्फिन्स्टन** ह्यांचा पुतळा आहे. ( १८१९–२७ ) ह्यांनींच विद्येची अभिरुचि मुंबईचे लोकांस लावून देऊन आपलें नांव अजरामर करून ठेविलें आहे. व ह्यांचेच नांवानें '**एल्फिन्स्टन**' **हायस्कूल** ही शाळा प्रसिद्ध आहे. दक्षिणेच्या उपभागाला **सर चार्लस फार्बस** ह्यांचा पुतळा आहे. उत्तरेच्या भागांत एकंदर सात पुतळे ठेवलेले आहेत. ते येणेंप्रमाणें:— **मिस्टर स्टीफन बॅबिंगटन**, दिवाणी अदालतीचे माजी जज्ज इ० स० १८२२. **सर जॉन मालकम्**, मुंबइचे माजी गव्हरनर इ० स० १८२७

ते ३०. **मिस्टर चार्लस नॉरीस**, माजी चीफ सेक्रेटरी इ० स० १८४२. **जॉन लार्ड एल्फिन्स्टन** मुंबईचे माजी गव्हरनर इ० स० १८५३ ते ६०. **सर जमसेटजी जिजीभाई**, बॅरोनेट इ० स० १८५७. **सर बार्टल फ्रिअर** मुंबईचे माजी गव्हरनर इ० स० १८६२ ते ६७. शिवाय तळमजल्यावर **नामदार जगन्नाथ शंकर शेट** इ० स० १८६४.

ह्या टाऊन हॉलाचा दिवाणखाना बहुतक बंद असतो. ह्या इमारतीचा उत्तरेकडील व दक्षिणेकडील भाग पहावयास सांपडतो.

## टांकसाळ.

( ४७ ) ही इमारत कोटांत प्रिन्स रोडचे टोंकास आहे. कोणासहि टांकसाळ पहाणें झाल्यास, त्यानें **मिंट मास्तर** यांचेकडे एक अर्ज करावा व त्या अर्जासोबत उत्तरादाखल एक आण्याचें तिकीट पाठवावें. अर्ज केल्यादिवसापासून दोन तीन दिवसांत 'परवानगी पास' मिळतो. त्या पासावर अर्ज करणारा व दुसरे तीन इसम एवढ्यांनाच टांकसाळ पाहण्याची परवानगी मिळते.

टांकसाळ पहावयास गेल्यावर दरवाज्यावर एक शिपाई असतो त्यास पास दाखवावा, म्हणजे तो जर दुसरी मंडळी आंत गेली असली तर ती बाहेर येई पावेतों थांबण्यास सांगतो. अशा मंडळीस बसण्यासाठीं दरवाज्यावर एक लहानशी चौकी बांधलेली आहे. टांकसाळ पाहण्यास आंत जातेवेळीं अंगावरील उपवस्त्र, छत्री वगैरे जिन्नस काढून ठेवावे लागतात.

प्रथम शिपाई आपणांस ज्या ठिकाणीं चार बोटें रुंदीचे, अर्धा इंच जाडीचे व आठ नऊ हात लांबीचे चांदीचे पत्रे ठेवलेले असतात तेथें घेऊन जातो. हे पत्रांचे तुकडे येथें परिक्षेकरितां आणलेले असतात. परिक्षा करून होतांच हे तुकडे भट्टीकडे पाठवितात. तेथें त्यांचा रस करून ते जितक्या जाडीचे, जितक्या रुंदीचे व जितक्या लांबीचे हवे असतील

तसे रस तयार करितात. ह्याप्रमाणें ओतून तयार केलेले पत्रे रुपयाइतके जाड असून, त्यांचे रुपये पाडले असतां साधारणपणें वजनांत बरोबर येतील किंवा नाहींत म्हणून तोलून पाहतात. कमी किंवा जास्त वजनाचे भरल्यास पुनः ओतण्याकरितां परत पाठवितात. हे पत्रे तोलण्याचें यंत्र एका तासांत हजारों पत्रांचे वजन करून देतें. बरोबर उतरलेल्या पत्राचे रुपयाचे आकाराचे वर्तुळाकार तुकडे पाडतात. नंतर हे तुकडे साफ करण्यासाठीं कानशीवर नेतात, तेथें हे तुकडे एका शृंगाकृति पितळेच्या नळीवर रचून ठेवितात. ही नळी सुमारें पांच मिनिटांत पांच सहाशें रुपये घासून साफ करिते. ह्याप्रमाणें घासून निघालेले तुकडे साफ व चकचकीत करण्यासाठीं पुनः भट्टींत घालतात. भट्टींतून त्यांना तापवून बाहेर काढले म्हणजे त्यांस ओप देऊन वाळवितात. वाळवून तयार झाले म्हणजे त्यांस पुनः कांट्यावर नेतात. तेथें नेल्यावर त्यांस दुसऱ्या एका शृंगाकृति नळींत एकावर एक रचून ठेवितात. असे हे रचून ठेवलेले तुकडे एक एक त्या कांट्यावर पडून कांट्याखालीं असलेल्या वेगवेगळ्या पेटींत जाऊन पडतात. बरोबर वजनाच्या व उत्तम आवाजाच्या तुकड्यास कांटा एके पेटींत ह्याप्रमाणें बरोबर, कमी व बदड रुपयांची कांटा संथपणें बरोबर व्यवस्था लावितो. कांट्यांतून जेवढे तुकडे खरे ठरून पेटींत पडतात त्या सर्वांना पुनः शिक्का मारण्याकरितां माशिनीवर घेऊन जातात. येथें हे तुकडे एका शृंगाकृति आकाराच्या नळींत रचून ठेविले म्हणजे एकामागून एक असे त्या नळींतील तुकडे शिक्क्यावर जाऊन पडले म्हणजे त्यावर खालून वरून शिक्का उमटतो. एका मिनिटांत ह्या माशिनींतून कमींत कमी दिडशें—दोनशें रुपये शिक्का मारून बाहेर निघत असतात. एवढें कृत्य उरकल्यानंतर त्या तुकड्यास रुपया हें नांव मिळतें. ह्याचप्रमाणें इतर सर्व प्रकारचीं नाणीं पाडण्यांत येतात. टांकसाळेंत इतकीं नाणीं पडलेलीं असतात कीं, पाऊल टाकण्याससुद्धां रिकामी पडलेली जागा

दृष्टीस पडत नाहीं. कारण रुप्याचे व तांब्याचे पत्रे व नाणीं वगैरे सर्वत्र ठिकाणीं पडलेलीं असतातच.

हें टांकसाळेचें अगदीं थोडक्यांत वर्णन झालें. परंतु प्रेक्षकांस अशी शिफारस करण्यांत येते कीं, शक्य त्यानें वेळांत वेळ काढून टांकसाळ मात्र अवश्य पहावी.

## जनरल पोस्ट ऑफिस.

( ४८ ) हें पोस्ट ऑफिस बोरीबंदर स्टेशननजीक फोर्ट स्ट्रीटचे अगदीं टोंकावर थोड्या वर्षांपूर्वीं बांधिलें आहे. ही इमारत बांधण्याचें कारण कोणास सांगितलें पाहिजे असें नाहीं. ह्या इमारतीची लांबी पूर्व पश्चिम विशेष आहे. ह्या इमारतींत तळमजल्यावर पत्रें राजिस्टर करण्याचीं, पत्रें देण्याचीं वगैरे अनेक ऑफिसें आहेत.

ह्या पोस्ट ऑफिसांत द्वीपांतरीं जाणाऱ्या लखोट्यांच्या व बुकपोष्टच्या पेट्या निराळया असून, हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांत जाणाऱ्या पत्रांच्या बुकपोस्टच्या पेट्या निराळ्या आहेत. तसेंच बाह्यदेशीं रजिस्टर अगर दुसऱ्या कोणत्याहि तऱ्हेनें पत्रें अगर दुसरा कोणताहि माल जाण्यासाठीं निराळीं खातीं ठेविलीं आहेत. व देशांतल्या देशांत जाणाऱ्या येणाऱ्याबद्दलचीं खातीं निराळीं ठेविलीं आहेत.

ह्या पोस्टऑफिसांत पोस्ट-खात्यास योग्य अशा सर्व प्रकारच्या सोयी काढलेल्या आहेत.

## व्हिक्टोरिया टर्मिनस ( बोरी बंदर स्टेशन. )

( ४९ ) जी. आय्. पी. रेल्वेचें मुंबईतील अगदीं पहिलें स्टेशन बोरी बंदर हें असून, सबंध हिंदुस्थानांतील स्टेशनांत हें स्टेशन अत्युत्तम असून मोठें आहे. हें स्टेशन बांधून काढण्यास इ० स० १८७८ मध्यें सुरुवात होऊन त्याचें संपूर्ण काम इ० स० १८८८ मध्यें पूर्ण करविण्यांत आलें. ह्या स्टेशनांत इ० स० १८८२ सालापासून आगगाड्या येऊं

जाऊं लागल्या. ह्या स्टेशनावर उतारू लोक गाडींतून उतरतांच कित्येक मोटारमध्यें, कित्येक व्हिक्टोरिया गाडीमध्यें व कित्येक ट्रामगाडीमध्यें बसून इच्छित स्थळीं जात असतात. तसेंच कित्येक गरीब लोक विशेष सामान असल्यास हेलकऱ्याजवळ देऊन पायींच जात असतात.

ह्या स्टेशनास मुख्य ६ प्लॅटफार्म्स असून एकंदर आठ रेल्वे लाइनी आहेत. ह्या मुख्य प्लॅटफार्म्सवर लोखंडी खांब उभे करून त्यांवर पत्रे बसविले आहेत. एका प्लॅटफार्मवरून दुसऱ्या प्लॅटफार्मवर जाण्यायेण्यासाठीं उत्तरेकडून मोठमोठे ४ जिने काढलेले आहेत. उतारूंस वेळ समजावा म्हणून प्लॅटफार्मवर दोन विशाळ घड्याळें ठेवण्यांत आलीं आहेत. एवढीं मोठीं घड्याळें बहुतेक कोठेंच ठेवण्यांत आलीं नाहींत. पहिल्या व दुसऱ्या वर्गाचे उतारूंकरितां एक मोठा दिवाणखाना असून त्याचे खांब संगमरवरी दगडांचे बनविलेले आहेत, व वर सुंदरशा गॅलऱ्या काढलेल्या आहेत. पहिल्या व दुसऱ्या वर्गाचे उतारूंसाठीं ह्याच दिवाणखान्यांचे शेजारीं तिकीट ऑफिसें, रिफ्रेशमेन्ट रुम्स् ( उपहारगृहें ) व वेटिंग रुम्स् ( विश्रांतीच्या खोल्या ) वगैरे आहेत.

ह्या इमारतीचा बहुतेक सर्व मध्यभाग एजंट, चीफ इंजिनिअर व चीफ अकौंटंट ह्यांच्या ऑफिसांत गुंतवून टाकला आहे. नैर्ऋत्य दिशेकडील भाग सरकारी मेल व पोस्ट ऑफिसें ह्यासाठीं ठेविला आहे. इमारतीच्या तिन्ही मजल्यावर ऑफिसें ठेवलेलीं आहेत. इमारतीच्या मध्यभागीं एक मोठें घड्याळ बसविलें आहे. ह्या घड्याळाखालीं व्हिक्टोरिया राणीचा सुंदर पुतळा उभा केलेला आहे. इमारतीचे दक्षिणबाजूस मोठा टॉवर असून त्यावर एक पुतळी उभी केलेली आहे. भिंतीवर पश्चिम अंगाला मोर व इतर पक्षी व तसेंच निरनिराळ्या जातींचे पुरुषांचे पुतळे कोरलेले आहेत. पावसाचें पाणी जाण्याकरितां ज्या मोऱ्या ठेवण्यांत आल्या आहेत त्यांचे तोंडाशीं माकडें, कुत्रे, व बाजूला वाघ, सिंह वगैरे जनावरांचे पुतळे बस-

विलेले आहेत. मुख्य दरवाज्यावर एके बाजूस सिंह व दुसऱ्या बाजूस वाघ असे पुतळे बसविले असून दरवाज्यावर एक लोखंडी कमान काढली आहे व तिजवर एक मोठा कंदील ठेविला आहे.

तिसऱ्या वर्गीचे उतारूंकरितां उत्तर बाजूस एक मोठा दिवाणखाना बांधलेला असून तेथेंच तिकीट ऑफिसेंहि ठेवण्यांत आलीं आहेत. ह्या ऑफिसांचे शेजारींच एक बुकिंग ऑफिस आहे.

## म्युनिसिपालिटी ऑफिस.

( ५० ) हें ऑफिस व्हिक्टोरिया टर्मिनसचे ( बोरीबंदरचे ) अगदीं समोरच आहे. ह्या इमारतीच्या बांधकामास ता. २५ माहे एप्रील सन १८८९ या सालीं सुरुवात होऊन तें ३१ माहे जुलै सन १८९३ मध्यें पुरें करविण्यांत आलें. ह्या इमारतीस एकंदर ११,१९,९६९ रुपये खर्च आलेला आहे.

ह्या इमारतींत तळमजल्यावर पूर्व दिशेस **ॲसेसमेन्ट ॲंड कलेक्शन डिपार्टमेन्ट व ए वार्ड ऑफिस** आहे. पश्चिम दिशेस हेल्थ **डिपार्टमेन्ट** आहे. पहिल्या मजल्यावर पूर्व दिशेस **अकाउंटस् डिपार्टमेन्ट व जाइंट स्कूल कमिटीचें ऑफिस** आहे. तसेंच पश्चिम दिशेस **कार्पोरेशन हॉल** असून **म्युनिसिपल कमिशनर व म्युनिसिपल सेक्रेटरा** यांचीं ऑफिसें आहेत. दुसऱ्या मजल्यावर पूर्व दिशेस **वॉटर इंजिनिअर, ड्रेनेज इंजिनिअर** व **स्पेशल ड्रेनेज इंजिनिअर** यांचीं ऑफिसें आहेत. तसेंच पुनः पश्चिम दिशेस **एक्झिक्युटिव्ह इंजिनिअर यांचें ऑफिस** आहे.

ह्या म्युनिसिपालिटी ऑफिसापुढें हल्लीं एक पुतळा उभा केलेला आहे. हा पुतळा मुंबईंतील प्रसिद्ध नागरिक **माजी सर पिरोजशहा मे. मेहता** यांचा असून, हे एक परम देशभक्त व प्रमुख हिंदी गृहस्थ होऊन गेले. हे इ० स० १९१५ सालीं आपले वयाचे ६० वे वर्षी मरण पावले.

## गव्हरनर साहेबांचा बंगला.

(५१)हा बंगला वालुकेश्वरास मलबार हिलच्या शेवटच्या टोंकावर असून तेथें गव्हरनर साहेब रहात असतात. ह्या बंगल्याकडे जातांना प्रथम दोन चौक्या लागतात. येथें शिपायांचा सतत पहारा असतो. रस्त्यावर दुतर्फा झाडी आहे. सर्व मुंबईंत अति थंड हवेशीर रमणीय स्थान ह्मटलें तर तें हेंच होय.पावसाळयांत येथें वारा मनस्वी वाहात असल्यामुळें येथें कोणी राहत नाहीं. हें स्थान हिंवाळा व उन्हाळा ह्या दिवसांत अत्यंत सुखकारक आहे. ह्या बंगल्यांत जेव्हां गव्हरनर साहेबांचा मुक्काम असतो तेव्हां ह्या बंगल्यावर निशाण फडकत असतें. ही इमारत भव्य असून अतिशय रमणीय आहे. इमारतीची आंतील रचना फारच मनोवेधक असून राजकीय थाटाची आहे. येथें परवानगीशिवाय कोणासहि येऊं देत नाहींत.

## परेल लेबॉरेटरी ( प्रयोग शाळा )

( ५२ ) ही प्रयोग.शाळा पहावयाची झाल्यास तेथील मुख्य अधिकारी जे डायरेक्टर साहेब ह्यांचेकडे प्रथम एक अर्ज करावा व त्या अर्जासोबत उत्तरादाखल एक आण्याचें तिकीट पाठवावें. अर्जाचें उत्तर येतांच त्यांत नमूद केलेल्या दिवशीं ठराविक वेळेस ही प्रयोगशाळा पहावयास जावें.

**अर्जाचा पत्ता—डायरेक्टर ऑफ परेल लेबॉरेटरी**
**परेल वार्ड, मुंबई.**

ही प्रयोगशाळा स्थापन करण्याचा मुख्य उद्देश म्हटला म्हणजे सूक्ष्म जंतूंपासून होणाऱ्या रोगांवर औषधोपाय शोधून त्यांचे प्रयोग करणें हा होय. येथील मुख्य प्रयोग म्हटला म्हणजे प्लेगप्रतिबंधक लस तयार करणें हा होय. ही लस **प्रोफेसर हॉफाकिन** नामक एका रशियन डाक्टरानें प्रथम शोधून काढिली. शिवाय या शाळेंत सर्पदंशावर औष-

घोपाय शोधून काढण्यासाठीं जें सर्पाचें विष लागत असतें तें विष काढण्याची कृति अत्यंत चमत्कारिक व प्रेक्षणीय आहे ह्यांत मुळींच संशय नाहीं. ह्या प्रयोगासाठीं येथें अनेक प्रकारचे विषारी जिवंत सर्प लहान लहान बनविलेल्या कांचेच्या कपाटांत ठेवलेले आहेत. तसेंच पिसाळलेल्या कुत्र्यांचे दंशावरहि येथें खात्रीशीर उपाय करविण्यांत येत असतात. ह्या प्रयोग शाळेंतील प्रयोग पाहण्याचा पदवीधर डाक्टर अगर मेडिकल कॉलेज स्टुडन्ट यांना विशेष फायदा असल्यामुळें त्यांनीं हे प्रयोग अवश्य पहावे. इतरांना हे प्रयोग पाहून कांहींच उपयोग होत नाहीं.

ह्या इमारतीचें बांधकाम बाहेरून अगदीं साधें केलेलें दिसतें; परंतु आंत जाऊन पाहिलें असतां तें राजकीय पद्धतीवर केलेलें आहे असें दिसून येतें. पूर्वींचें **'गव्हरमेन्ट हॉऊस'** ज्या स्थळीं होतें तेंच हें स्थळ होय. हल्लींचें नवें गव्हरमेन्ट हॉऊस वाळकेश्वर येथें बांधाविण्यांत आलें असून त्यांत गव्हरनर साहेब राहात असतात.

## धी व्हिक्टोरिया मेमोरिअल स्कूल ऑफ दी ब्लाइंड.
## ( आंधळ्यांची शाळा. )

( ५३ ) ही शाळा ताडदेव रस्त्यावर असून इ० स० १९०२ या सालीं स्थापन झाली आहे. आंधळा मुलगा जन्मास येऊन न येऊन सारखाच असल्यामुळें, अशा आंधळ्या मुलास देखील स्वतंत्र रितीनें हुन्नर कलेच्याद्वारें आपला उदरानिर्वाह उत्तम प्रकारें चालवितां यावा हा या शाळेचा मुख्य उद्देश आहे. या शाळेंतील अंध मुलांना ज्या लिपींत शिक्षण देण्यांत येतें ती लिपी **डॉ० निलकंठराय छत्रपति** यांनी इंग्रजी लिपीवरून बनविली आहे. हे सद्गृहस्थ एल्. एम्. अँड एस्. ह्मणजे डाक्टरकीची परीक्षा पास झालेले असून ही परीक्षा पास झाल्यानंतर कांहीं दिवसांनीं दुर्दैवानें यांची दृष्टि जाऊन त्यांना अंधत्व प्राप्त झालें. नंतर अंधत्वांत त्यांनीं ही लिपी शोधून काढिली.

हल्लीं या शाळेवर डॉ० निलकंठराय छत्रपति यांचे बंधु **मि० हरीप्रसाद छत्रपति** हे प्रिन्सिपाल आहेत. ह्यांचा स्वभाव फारच मायाळू, शांत व प्रेमळ असा आहे.

ह्या शाळेंत वर दर्शविलेल्या लिपीवरून प्रिन्सिपाल अंध मुलांना लिहिणें, वाचणें, सोपें अंकगणित वगैरे विषय शिकवीत असतात. शिवाय शिवणकला, गायनकला, वाद्यकला व खुर्च्या, पलंग, टेबलें इत्यादिकांच्या बैठकीचें विणकाम वगैरे पुष्कळ उपयुक्त कला शिकवीत असतात. हें सर्व शिक्षण गुजराथी व मराठी भाषेंत देण्यांत येतें. कित्येक मुलांना तर इंग्रजी भाषेचेंहि थोडक्यांत शिक्षण देण्यांत येतें. ह्या लिपी शिकविण्याची पद्धत अशी आहे कीं, एका जाड कागदास ० ० ० अशीं सहा ठिकाणीं भोंकें पाडलेलीं असतात, त्या भोंकावर बोट ठेविलें असतां त्या भोंकांचा बोटास स्पर्श होऊन भोंकांचें स्थान व त्यांची संख्या ह्यांवरून अक्षरांचें ज्ञान प्राप्त होतें. ह्या लिपींत लिहिलेलीं पुस्तकें येथील विद्यार्थी स्पष्ट रितीनें वाचीत असतात.

येथील विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, ज्यांना सुईंत दोरा ओंवण्याची संवय नाहीं अशा डोळस मनुष्यापेक्षांहि थोड्याशा वेळांत हीं अंध मुलें सुईंत दोरा सहज ओंवूं शकतात. ह्या शाळेंत शिकून तयार झालेलीं पुष्कळशीं अंध मुलें हल्लीं मुंबईंत शिवणकामांत दरमहा २५ ते ५० रुपयांपर्यंत; खुर्च्या, पलंग, टेबलें इत्यादिकांच्या बैठकीचें वेतकाम करण्यांत दरमहा २० ते ७५ रुपयांपर्यंत; गायन व वादन कलेंत दरमहा २५ ते १२५ रुपयांपर्यंत पगार मिळवून आपला उदरनिर्वाह अगदीं चैनींत चालवीत आहेत.

या शाळेंत ७ वर्षांचे वरील व २० वर्षांचे आंतील सर्व जातीच्या अंध मुलांना दाखल करविण्यांत येत असतें. मुलांची खाण्यापिण्याची व्यवस्था ब्राह्मण आचाऱ्याकडे सोंपविली असून, खाण्यापिण्याचे व व्यव-

हाराचे बाबतींत मात्र ज्याचे त्याचे जातिधर्माप्रमाणें आचारविचार पाळण्यांत येत असतात. या शाळेंत येणाऱ्या विद्यार्थ्यांची खाण्यापिण्याची, राहण्याची व कपडालत्त्यांची सोय फुकट केली जाते.

**वाचकवर्गास महत्त्वाची सूचनाः**—वाचकवर्गापैकीं कोणीहि आपल्या अगर आसपासचे गांवीं कोणत्याहि जातीचें वर दर्शविलेल्या वयाचें अंध मूल पाहिल्यास, त्यांनीं त्याचे आईबापास अगर पालकास कळवून त्या मुलास ह्या शाळेंत पाठविण्याविषयीं सुचवावें. ह्यायोगें त्या बिचाऱ्या अंध मुलास सज्ञान झाल्यावर आपल्या उदरनिर्वाहाची तरी काळजी राहणार नाहीं. एवढें पुण्यकर्म करण्यास वाचकांनीं आळस करूं नये एवढीच आग्रहाची नम्र विनंति आहे.

## प्रो. दाते यांची मुक्यांची शाळा.

( ५४ ) ही मुक्यांची शाळा ठाकुरद्वार रोडवर झावबाचे वाडींत असून ती **प्रोफेसर हरी अनंत दाते** यांनीं इ० स० १९०७ या सालीं स्थापन केली आहे. ह्या शाळेचा मुख्य उद्देश ह्मटला ह्मणजे **मुक्या मुलांना बोलके करणें** हा होय. आज हिंदुस्थानांत मुक्यांच्या कित्येक ठिकाणीं शाळा स्थापन करविण्यांत आल्या आहेत, त्यांपैकीं **कलकत्ता, अहमदाबाद, बडोदा, ह्मैसाना, ह्मैसूर, पालमकोट, मिलापूर, बेंगलूर, व बरद्वान येथील** शाळांमध्यें अमेरिकन शिक्षणपद्धतीच्या धर्तीवर मुक्या मुलांना शिक्षण देण्यांत येतें. ह्या अमेरिकन पद्धतीनें शिकविल्यास मुलांना फक्त लिहितां वाचतां येतें. परंतु स्पष्ट बोलतां येत नाहीं.

**प्रो. हरी अनंत दाते** यांनीं अमेरिकन शिक्षणपद्धतीचा स्वीकार न करितां दीर्घ परिश्रम घेऊन मुक्या मुलांना स्पष्ट बोलतां यावें अशा प्रकारची पद्धत शोधून काढिली व त्याच पद्धतीवरून ते आपल्या शाळेंतील मुक्या मुलांना शिकवीत असतात. ह्या पद्धतिवरून मुलगा शाळेंत आल्यापासून केवळ ६ वर्षांत आपली मातृभाषा स्पष्ट बोलूं

शकतो. या शाळेंत अनुभव घेऊन शिकलेल्या मास्तर लोकांनीं **पुणें, उमरावती, नागपूर, सुरत, जामनगर, मंडालें, गांवखडी वगैरे** ठिकाणीं शाळा स्थापन केल्या आहेत.

या शाळेंत हल्लीं पांच मास्तर व ३२।३३ मुलें आहेत. या शाळेंत धर्मादाय शिक्षण दिलें जातें. बाहेरगांवचे विद्यार्थी लोकांसाठीं हल्लीं या शाळेंत एक बोर्डिंग जोडविण्यांत आलें असून त्याचा योग्य तो चार्ज घेण्यांत येत असतो.

गरीब बापडीं लहान लहान मुलें वाचा नसल्यामुळें कशीं असहाय स्थितींत असतात याचा सर्वांस अनुभव आहेच. मुक्या मुलांना बोलके करणाऱ्या या प्रोफेसर साहेबांचे जेवढे गुणानुवाद गावे तेवढे थोडेच होणार आहेत.

---

# हवा खावयाचीं ठिकाणें.

## ब्याक बे उर्फ चौपाटी.

( ५५ ) बी. बी. सी. आय् रेल्वेच्या चर्नी रोड स्टेशनानजीक ब्याक बे असून हिलाच चौपाटी असें म्हणतात. हें एक हवा खाण्याचें उत्तम ठिकाण असल्यामुळें ह्या ठिकाणीं संध्याकाळचे चार पांच वाजण्याचे सुमारास शहरांतील हजारों मनुष्यें, स्त्रिया व मुलें हवा खावयास नित्य येत असतात. त्यांत बहुतेक जातींपैकीं स्त्री–पुरुष असल्यामुळें त्यांचे निरनिराळे पोषाख, निरनिराळ्या जातींचीं पागोटीं व वेगवेगळ्या जातींचे हजारों लोक दृष्टीस पडत असल्यामुळें, येथें एकादी यात्राच भरली आहे कीं काय असा भास साहाजिक उत्पन्न होतो. सूर्यास्ताचे सुमारास पारशी लोक आपआपलीं धर्मपुस्तकें वाचून होतांच समुद्रतीर्थ प्राशन करण्यास

धक्याचे खालीं जात आहेत; हिंदु लोक सूर्यस्तुति करण्यांत व समुद्र-दर्शन घेण्यांत गर्क झाले आहेत; भरतीच्या वेळीं समुद्राच्या लाटा धक्क्या-वर आपटत आहेत व त्यायोगें पाण्याचे तुषार उडत आहेत त्यांची मजा पाहण्यांत कित्येक लोक गुंग आहेत; ओहोटीच्या वेळीं समुद्राचें पाणी कमी होत असल्यामुळें मंद मंद लाटांचीच कित्येक लोक गंमत पहात आहेत; कित्येक समुद्राचे किनाऱ्यावर ठेवलेल्या बांकावर बसून हवा खात आहेत; कित्येक समुद्रांतील अत्यंत मृदु अशा सिकताकणांत बसून नानाप्रकारचे खेळ खेळण्यांत अगर गप्पाष्टकांत वेळ घालवून समाधान मानून घेत आहेत; कित्येक फेरीवाले मधून मधून वाळवंटांत '**चणा ल्योरे गरमगरम**' '**गंडेरी ल्योरे गंडेरी**' '**आईस्क्रीम**' '**सोडा-वाटर**' असे मुखानें चमत्कारिक स्वर काढून फिरत आहेत; कित्येक विद्यार्थी पुस्तकें वाचण्यांत तल्लीन झाले आहेत; अशा प्रकारचा जनस-मुदाय येथें नित्य दृष्टीस पडत असतो. तसेंच प्रांग्स लाइट हाऊसांतील दिवा संध्याकाळपासून फिरत असतो त्याची चमक समुद्रांतील पाण्यावर पडून समुद्रांत जणूं काय हजारों दिवे लाविले आहेत कीं काय असा पाहणारांस भास होतो. दुसरें असें कीं, वाळकेश्वराचे टेंकडीपासून तों कुलाब्याचे दांडीपर्यंत असलेल्या धनुष्याकृति रांगेंतील शेंकडों दिवे, सड-केवर होणारा मोटार गाड्यांचा व व्हिक्टोरियांचा सुळसुळाट वगैरे मजा पाहून प्रेक्षकांचें मन अगदीं थक्क होऊन जातें. अशी त्यांची चमत्का-रिक स्थिति होणें साहजिक आहे. कारण मुंबईंत हें स्थळ खरोखरच चित्ताकर्षक असून घटकाभर जिवास आराम देणारें व मनास समाधान देणारें आहे ह्यांत मुळींच शंका नाहीं.

## हँगिंग गार्डन ( सर पिरोजशहा गार्डन. )

( ५६ ) हा बाग बाबुलनाथाचे देवळानजीक पश्चिमेच्या बाजूस जी एक उंच टेंकडी दृष्टीस पडते त्या टेंकडीवर मुद्दाम सार्वजनिक लोकांच्या

उपयोगासाठीं तयार करविण्यांत आला आहे. ह्या बागेंत देखील सायं-काळीं ५-६ वाजण्याचे सुमारास चौपाटीप्रमाणेंच शहरांतील हजारों मनुष्यें स्त्रिया व मुलें फिरावयास येत असतात. त्यांत विशेषतः पारशी, युरो-पिअन, विद्यार्थी वगैरे लोकांची जास्त गर्दी जमत असते. मुंबईंत हें ठिकाण सर्वांत अति उंच असल्यामुळें येथील हवा फार सुरेख आहे. ह्या बागेंत फिरण्याकरितां नागमोडी वळसे घेतलेले बरेच रस्ते तयार केलेले असून मनुष्यांना विश्रांती घेण्याकरितां ठिकठिकाणीं बांक ठेवलेले आहेत. ह्या बागेंत समोरच एक कारंजें असून, येथें नानापरीचीं चित्र-विचित्र रंगांचीं फुलझाडें लाविलीं असल्यामुळें ह्या बागेस विशेष शोभा आली आहे. ( ह्या बागेविषयीं सदर पुस्तकाचें ३५ वें पान पहा. )

## ॲपोलो बंदर.

( ५७ ) हें बंदर प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियमपासून पुढें अगदीं थोड्याशा अंतरावर आहे. ह्या बंदरावरहि कित्येक लोक हवा खावयास येत असतात. येथें येऊन उभें राहिलें ह्मणजे दृष्टीपुढें समुद्राचा एक प्रकारचा रम्य देखावा दृष्टीस पडतो. समुद्राचे अगदीं कांठीं धक्क्यावर हल्लीं एक मोठा दरवाजा बांधविण्यांत आला असून, त्याचें काम नुक-तेंच पूर्ण करविण्यांत आलें आहे, व त्यास इंग्रजींत **गेट ऑफ इंडिया** ( हिंदुस्थानचा दरवाजा ) असें नांव देण्यांत आलें आहे.

ह्या बंदरावर जो एक पुतळा स्थापन केलेला आहे तो **माजी व्हाइ-सराय आणि गव्हरनर लार्ड हार्डिंग** यांचा असून, त्याचे चौथऱ्याचे दक्षिणोत्तर बाजूस दोन सिंह बसविले आहेत.

पूर्वेकडील बाजूस एका युरोपिअन लेडीचा पुतळा असून तिचे मांडीवर एका मृत बालकाचा पुतळा आहे व एक मुलगी ह्या लेडीचे स्कंधावर हात व डोकें ठेऊन उभी आहे असा शोकातुर देखावा दाखविला आहे. तसेंच पश्चिमेकडील बाजूस एक युरोपिअन लेडी बसलेली असून तिचे दोहों बाजूंस दोन मुलें उभीं आहेत असा देखावा आहे.

येथें लहान लहान मचवे, होड्या वगैरे वाहनें समुद्रांत फिरवून आण-ण्यासाठीं नेहमीं तयार असतात. ह्यांत कित्येक मनुष्यें प्रत्येकीं दोन दोन आणे देऊन मैल दोन मैल समुद्र पर्यटन करावयास जात असतात.

## घोड्यांच्या शर्यती.

(५८) मुंबईस घोड्यांच्या शर्यती बी. बी. सी. आय्. रेल्वेच्या महालक्ष्मी नामक स्टेशनानजीक एक मोठें खुलें मैदान आहे त्या मैदानांत होत असतात. ह्या शर्यतीस '**हार्स रेसीस**' असें ह्मणतात. ह्या हॉर्स रेसीस खेळण्यास दरवर्षीं फेब्रुआरी महिन्यापासून प्रारंभ होत असतो. हार्स रेसीसचे दिवशीं ह्या शर्यतीचे कंपाउंडांत पैजा लावणारे लोकांचा प्रचंड समुदाय जमत असतो. ह्या शर्यतीच्या कंपाउंडांत जाण्यासाठीं ठराविक दरांचीं तिकिटें ठेवलेलीं असतात. सबब तिकिटें काढून आंत जावें लागतें. आंत बसण्यासाठीं उतरत्या बाकांच्या बऱ्याचशा उतरंडी करून ठेविलेल्या असतात. त्यांवर जाऊन बसावें. ज्यांना हीं तिकिटें काढावयाचें सामर्थ्य नसेल त्यांनीं पुढें असलेल्या गोलार्धाचे आंतील खुल्या मैदानांत जाऊन बसावें ह्या मैदानांत देखील कांहीं गुलहौशी लोक दोन आण्यांपासून एक रुपयापर्यंत आपापल्या सामर्थ्यानुरूप मर्जीस येईल त्या नंबरच्या शर्यतींत घोड्याचें तिकीट काढून पैजा लावीत असतात.

ह्या हार्स रेसीस ठराविक दिवशीं व ठराविक वेळेसच सुरू होत असतात. दिवसांतून सहा सात किंवा आठ देखील हॉर्स रेसिस कित्येक वेळां होत असतात. ह्याविषयीं अगोदर शर्यतीचें माहितीपत्रक छापून काढलें जातें व तें हॉर्स रेसीसचे दिवशीं सूर्योदयापासून विकलें जातें. शिवाय वर्त-मानपत्रांतूनहि लोकांस जाहीर केलें जातें. ह्या माहितीपत्रकांत प्रत्येक शर्यतींत किती घोडे सुटणार? ते किती वाजतां सुटणार? शर्यत किती वेळांत पूर्ण होणार? शर्यतींत धांवणाऱ्या घोड्यांचीं नांवें, घोड्यावर

आरूढ होणाऱ्या मनुष्यांचीं ( ज्याकींचीं ) नांवें, शर्यत किती मैलांची वगैरे शर्यतीविषयीं संपूर्ण माहिती दिलेली असते. हें माहितीपत्रक शर्यतीचे दिवशीं ठिकठिकाणीं विकत मिळत असतें.

शर्यतीच्या नियमित वेळीं घोडे शर्यतीच्या मुख्य ठिकाणीं आणून दाखविण्यांत येतात, नंतर हे घोडे जेथून शर्यत सुटावयाची असेल तेथें नेऊन उभे करितात. इकडे घोडे पाहून कित्येक पैज लावणारी मंडळी आपापल्या सामर्थ्यानुरूप मर्जीस उतरलेल्या नंबराच्या घोड्यांचीं तिकिटें काढतात. एवढें होतांच ठराविक वेळेस घोडे भरधांव सोडण्यांत येतात; परंतु घोडे सुटतांना सर्व घोडे एकदम न सुटतां मागें पुढें झाल्यास त्यास '**फाल्स स्टार्ट**' असें म्हणतात. फाल्स स्टार्ट झाला म्हणजे सर्व घोडे थांबविण्यांत येतात. नंतर पुनः नव्यानें सर्व घोड्यांना रांगेनें उभें करून नंतर सोडतात. हे शर्यतीचे घोडे भरधांव एकदम धांवत असतांना पाहून मोठा चमत्कार वाटतो. नियमित वेळांत व सर्व घोड्यांचे पुढें जो घोडा येतो तोच पहिल्या नंबरची व दुसरा दुसऱ्या नंबरची शर्यत जिंकतो. ही शर्यत खलास होतांच जिकडे तिकडे लोकांची एकच खळबळ उडालेली दृष्टीस पडते. जे लोक शर्यत जिंकतात ते मोठ्या आनंदानें उड्या मारीत रुपये घेण्यास धांवपळ करितात व जे हरतात ते हिरमुसलें तोंड करून उगीच बसतात.

घोड्यावर स्वार झालेल्या ज्याकीचा शर्यतीच्या वेळांत घोडे धांवत असतांना अगदीं दम निघून जातो; व तितका काळपर्यंत त्याचें जीवितहि अगदीं धोक्यांत असतें. ह्या ज्याकीस घोड्यावर स्वार होण्याबद्दल भरपूर रुपये देण्यांत येत असतात व शिवाय ज्या ज्याकीचा घोडा एक नंबरची शर्यत जिंकतो त्या ज्याकीस इनाम देण्यांत येत असतें. हे शर्यतीचे घोडे बहु मोल किंमतीचे असतात. ह्या घोड्यांपैकीं कांहीं घोडे मोठमोठे धनिक, सरदार किंवा संस्थानिक यांचे असतात. घोडा

पहिल्या नंबरची शर्यत जिंकल्यास घोड्याचे मूळ धन्यास भरपूर रुपये बक्षिस मिळत असतात. शर्यतीच्या पूर्वी प्रत्येक घोड्यास मद्य पाजाविण्यांत येत असतें. शर्यतींत ज्याकी कदाचित् वाऱ्याचे जोरानें उडून जाऊं नये म्हणून त्याचा अगोदर बंदोबस्त करविण्यांत येत असतो. ह्या शर्यतींत लाखों करोडों रुपयांचा चुराडा होऊन प्रत्येक हार्स रेसीसचे दिवशीं बहुतेक लोकांचे खिसे खाली होत असतात; तरी देखील पुनः पुनः शर्यतींत जाऊन शर्यत खेळण्याची लोकांची दुष्ट व घातुक संवय नष्ट होत नाहीं हें मोठें आश्चर्य नव्हे काय ?

---

## घारापुरी.

मुंबईप्रमाणेंच घारापुरी हेंहि पण एक लहानसें सुंदर बेट असून, मुंबईच्या पूर्वेस सहा सात मैलांवर आहे. ह्या बेटावर प्रसिद्ध अशा चार पांच लेण्या डोंगरांत कोरलेल्या आहेत. हें बेट पहाण्यास आलेक्झांड्रा डॉक-हून बोटीनें निघालें असतां सुमारें दीड तासांत मनुष्य तेथें सहज जाऊन पोहोंचतो. बोटींतून लांबून पाहिलें असतां प्रथमतः एक टेंकडीची रांग दृष्टीस पडते; तींत लेण्या असतील अशी कल्पनादेखील होत नाहीं. बेटाजवळ जातांच धक्का दिसूं लागतो. ह्या बेटाकडे जाण्याचा मार्ग किनाऱ्याच्या पश्चिम बाजूनें आहे. धक्क्यापासून थोड्या अंतरावर कित्येक पायऱ्या बांधलेल्या दृष्टीस पडतात. ह्या पायऱ्या सुमारें पाऊणशें वर्षांपूर्वी मुंबईतील एका धनिक व्यापाऱ्यानें बराच खर्च करून बांधविल्या आहेत असें म्हणतात. ह्या बेटावर नानाप्रकारचीं झाडें असून, तें एका लहानशा खिंडीनें दुभागलें गेलें आहे.

ह्या लेण्या कधीं व कोणीं कोरल्या असाव्यात ह्याविषयीं निश्चयात्मक असें कांहींच सांगतां येत नाहीं. परंतु ह्या लेण्या निदान चार हजार वर्षांपूर्वी कोरल्या असाव्यात असा बहुतेकांचा तर्क आहे. कारण येथील

मूर्त्यांची ढब, देवळें, मूर्त्यांच्या अंगावरील दागदागिने, पोषाख वगैरे पाहूं गेलें असतां ह्या लेण्या हिंदूंनींच कोरलेल्या असाव्यात असा खास तर्क होतो. ह्यावरून ह्या लेण्या बहुतेक पांडवांनींच कोरल्या असाव्या असा हिंदु लोकांचा समज आहे.

गुहेकडे जाण्यास पायऱ्या बांधून काढलेल्या आहेत. खालील पायऱ्या कांहींशा रुंद असल्यामुळें चढण्यास फार जड जात नाहींत; परंतु जसजसें वर जावें तसतशा पुढील पायऱ्या अरुंद व उंच होत गेल्यामुळें वर चढ-तांना मनुष्यास पायऱ्या केव्हां संपतील असें होऊन जातें. पायऱ्या चढून संपल्या म्हणजे मनुष्य अगदीं गुहेच्या मुखाजवळ येऊन पोहोंचतो. कांहींसें पुढें गेलें म्हणजे गुहेंतील कांहीं भाग दिसूं लागतो. गुहेंत नेहमीं काळोख असल्यामुळें आंत गेल्यावर कांहीं वेळानें तेथील देखावा स्पष्ट दिसूं लागतो. गुहेच्या मुखाशीं दोन मोठमोठ्या व दोन लहान लहान अशा खांबांच्या रांगा आहेत व ह्यांचेच आधारावर डोंगर आहे. खांबावर सुबक खोदींव काम केलेलें असून, त्यावर नानातऱ्हेचे मोठमोठे पुतळे कोरलेले आहेत. त्यांपैकीं कांहीं पुतळे तर सात सात आठ आठ फूट उंचीचे आहेत. त्यांतून पुढें गेल्यावर मुख्य देवालय आहे. येथें पुनः खांबांच्या चार रांगा आहेत. हे सर्व खांब सारखे समांतर रेषेंत आहेत. त्यामुळें मुख्य दरवाज्यापासून तों थेट देवळापर्यंत एकसारखे तीन मंडप पसरून दिले आहेत कीं काय असा भास होतो. आतां बहुतेक खांबांचे तळवट व वरील बराचसा भाग पाण्यानें धुवून गेला आहे. मात्र मधून मधून तीर व मथाळे वगैरे कांहीं डोंगराच्या आधारानें राहिले आहेत. मुख्य मूर्ति व देवळाच्या भिंतींत कोरलेलीं बहुतेक चित्रें अगदा मोड-कळीस आलीं आहेत. देवळाच्या समोरासमोर दोन लहान लहान अंधा-रमय कोठड्या आहेत. त्या इतक्या अंधारमय असतात. कीं, दिव्याच्या प्रकाशावांचून तेथें कांहींच दिसत नाहीं. येथें एक मोठा स्त्रीचा पुतळा

आहे. तो बहुतकरून पार्वतीचा असावा. असा हिंदु लोकांचा समज आहे. हा पुतळा एकस्तनी आहे. देवळाच्या उजव्या अंगास आंत खोद-लेल्या देवळांत एक शिव लिंग आहे. ह्या देवळास चौबाजूंस चार दरवाजे आहेत. ह्या गुहेच्या भिंतींत अनेक चित्रें कोरलेलीं आहेत. परंतु त्यांतील बहुतेक चित्रें आतां छिन्नभिन्न होऊन गेलीं आहेत.

एकंदरींत ही प्राचीन कारागिरी फारच प्रेक्षणीय आहे. येथें प्रतिवर्षी महाशिवरात्रीस शिवोत्सवाप्रीत्यर्थ बरीच मोठी यात्रा भरत असते. बाहेर-गांवचे उतारू लोकांनीं मुंबई पहातांना हें ठिकाण अवश्य पहावें.

## व्हिक्टोरिया गाडीचे भाड्याविषयीं माहिती.

प्रत्येक व्हिक्टोरिया गाडींत ३ उतारूंस व त्यांचे प्रत्येकाबरोबर ७ वर्षांचे आंतील दोन मुलांस बसूं देण्याची परवानगी आहे.

वेळेनुसार दर मैलास अथवा त्याचे भागास ८ आणे.

कोटांतील फ्लोरा फाउंटेनपासून ( कुलाबा पाइंट, चौपाटी, भाय-खळा वगैरे ) ३। मैलांच्या अंतरावर असलेल्या ठिकाणीं जाव-याचें झाल्यासः—

वेळेनुसार वर पहिल्या तासास २॥ रुपये व पुढें दर अर्ध्या तासास अथवा त्याचे भागास १२ आणे.

खालील रस्त्यांवरून अथवा त्यांचे भागांतून गेल्यास ४ आणे भाडें अधिक द्यावें.

नेपिअन रोड, गवालिया टँक रोड, पेडर रोड, आल्टमान्ट रोड, हार्क-नेस रोड, डोंगरी, वायल्डरनेस रोड, ॲडमाउंट रोड, इत्यादि.

पाव तास अथवा अर्धा तास खोटी केल्यास ४ आणे अधिक द्यावे.

---

## खालीं दिलेलें भाडें फ्लोरा फाउंटेन पासून समजावें.

| | रु.आणे. |
|---|---|
| आलेक्झांड्रा डॉक ( रेडगेट ) | १० |
| ॲपोलो बंदर | ८ |
| मोले स्टेशन | ८ |
| भायखळा क्लब | १—६ |
| भायखळा रेल्वे स्टेशन | १—६ |
| हार्नबी व्हेलार्ड | १-१२ |
| क्राफर्ड मार्केट | ८ |
| कुलाबा रेल्वे स्टेशन | १२ |
| खंबाला हिल | १—८ |
| ग. हाऊस मलबार हिल | १-१२ |
| ग्रँट रोड रेल्वे स्टेशन | १--४ |
| कुलाबा अफगाण एम्. चर्च | १२ |
| प्रिन्सेस अँड व्हिक्टोरिया डॉक | १४ |
| महालक्ष्मी बॅटरी | १-१२ |
| माटुंगा | ३—६ |
| जी. आय. पी. वर्कशाप परेल | २-१० |
| पोलीस हेड ऑफिस | ८ |
| शिवडी | २—१० |
| सेंट जार्ज हॉस्पिटल | ८ |
| टावर्स ऑफ लायसेन्स | १-१२ |
| व्हिक्टोरिया गार्डन | १—८ |
| व्हिक्टोरिया टर्मिनस | ८ |
| जे. जे. हॉस्पिटल | १ |
| महालक्ष्मी रेसकोर्स | १-१२ |

## मोटारकारविषयीं माहिती.

कोणत्याहि भाड्याचे मोटारकारमध्यें बसावयाचें झाल्यास दर मैलास प्रत्येक मनुष्यास ८।१०।१२ आणे पावेतों चार्ज पडतो. प्रत्येक भाड्याचे मोटारगाडीस टॅक्सी मिटर नांवाचें एक यंत्र लावलेलें असतें. ह्या यंत्रावरून किती मैल प्रवास झाला व त्याबद्दल भाड्याचा आकार एकंदर किती झाला हें आपोआप समजून येतें. मात्र भाड्याची मोटारगाडी करतांना ह्या टॅक्सी मिटरकडे प्रथम लक्ष द्यावें. व ड्रायव्हरास तें नीट चालू ठेवण्याबद्दल सुचवावें.

## व्यापाराविषयीं उपयुक्त माहिती.

आजकाल सबंध हिंदुस्थानांत व्यापाराविषयीं प्रमुख स्थान म्हटलें म्हणजे '**मुंबई बंदर**' हें होय. येथें देशपरदेशचे अनंत व्यापाऱ्यांची वस्ती असल्यामुळें, ते युरोप, अमेरिका, आफ्रिका, जर्मन, चीन, जपान, वगैरे बाह्य देशांतील व्यापारी लोकांशीं दळणवळण ठेऊन, नाना प्रकारचा माल मागवीत असतात; व येथून तोच माल पुनः हिंदुस्थानांतील हजारों शहरीं आर्डरीप्रमाणें रवाना करीत असतात. परगांवचे व्यापाऱ्यांस येथील मुख्य मुख्य व्यापाराविषयीं थोडक्यांत माहिती व्हावी या उद्देशानें खालीं व्यापाराविषयीं साधारण माहिती दिली आहे ती प्रत्येकानें अवश्य वाचून पहावी.

## कॉटन ग्रीन (कापसाचें मार्केट)

(५९) हें कापसाचें मार्केट पूर्वी कुलाब्यास होतें परंतु हल्लीं तेथून तें मोडून टांकबंदरनजीक शिवडीस ठेवण्यांत आलें आहे. ह्या कापसाचे मार्केटासच '**कॉटनग्रीन**' असें म्हणतात. येथें न्यू आर्लियन्स शहराप्रमाणें कापसाच्या व्यापाराची मोठी घडामोड होत असते. न्यू आर्लियन्स शहराप्रमाणें कापसाच्या व्यापारासंबधानें दुसरें शहर जगांत नाहीं.

न्यू आर्लियन्स शहराबरोबर मुंबई शहराची तुलना केली असतां किंबहुना मुंबई त्याच्या खालोखाल आहे असें म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं. येथें प्रत्येक व्यापारी आपापल्या धंद्याच्या मानानें जागा भाड्यानें घेतो. ह्या त्यांच्या जागेस ' **जथ्था** ' असें म्हणतात. शिवडीस व्यापारी लोक एकत्र जमून मालाची देवघेव करीत असतात. ही देवघेव सकाळीं आठ ते दहा व संध्याकाळीं दोन ते पांच वाजेपर्यंत होत असते. कापसाचा हंगाम दिपवाळीपासून सुरू होतो. तो ज्येष्ठ अखेर पावेतों मोठा झपाट्यानें चालतो. त्यांत इंग्रजी मार्च, एप्रील, जून ह्या तीन महिन्यांत हा व्यापार फार जारीनें चालतो. युरोपिअन व्यापारी कापसाचा भाव ठरवून मग जथ्थ्याकडे जातात. तेथें गेल्यावर पडलेल्या गठ्ठ्यांतून कापसाचे कांहीं गठ्ठे पसंत करून त्यावर आपली निशाणी करीत असतात.

**पक्क्या कपाशीविषयीं साधारण माहिती**—मुंबईंत सर्वांत मोठा व्यापार म्हटला म्हणजे पक्क्या कपाशीचा होय. हिंदुस्थानांत मुंबई हें पक्क्या कपाशीच्या व्यापाराचें अग्रस्थान होय. येथून देशोदेशीं पक्की कपाशी पाठविली जाते. कच्च्या कपाशीचें उत्पन्न हिंदुस्थानांत बऱ्याचशा भागांत होत असल्यामुळें, हिंदुस्थानांत प्रतिवर्षी कमींत कमी ३५।४० लाखापर्यंत कपाशीच्या गांठा तयार होत असतात.

हिंदुस्थानांतील पक्क्या कपाशीच्या एकंदर ८ जाती मानल्या आहेत. व त्यांवरूनच त्यांचा भाव ठरविण्यांत येत असतो. ह्या जातींचीं नांवें पुढीलप्रमाणें समजावीं. (१) **भडोच**; (२) **धोलेरा**; (३) **धारवाड**; (४) **उमरा**; (५) **वेस्टर्न** (मद्रासकडील व निजाम सरकारचे प्रदेशाकडील); (६) **बंगाल**; (७) **कुमठा** (धारवाडकडील एक जात); (८) **मठीओ** (काठियावाड, महुवा, भावनगरकडील)

ह्या वरील सर्व जातींमध्यें भडोच एथील पक्की कपाशी सर्वांत उत्तम गणली जाते. नवसारी प्रांताची कपाशी १०० टक्के उंच असते. कपा-

शीच्या ज्या वर आठ जाती दर्शविल्या आहेत त्यांत पुनः प्रत्येक जातींत हलके भारी असे वर्ग असतात. हे वर्ग एकंदर चार आहेत. त्यांचीं नांवें **सुपर-फाईन, फाईन, फुलिगुड व गुड.** ह्या प्रत्येक वर्गाचे कपाशीचे किंमतींत खालीं दर्शविल्याप्रमाणें फरक पडत असतो:—सर्वांत उंच सुपर-फाईन, सुपरफाईनपेक्षां १० टक्के हलका तो फाईन, फाईन पेक्षां १० टक्के हलका तो फुलीगुड, व फुलिगुडपेक्षां १० टक्के हलका तो गुड. कपाशीचा भाव खंडीवरून ठरवीत असतात. मुंबईची खंडी २८ मणाची गणली जाते. कपाशीची गांठ ४८० रत्तल म्हणजे बंगाली ६ मणाची बांधली जाते. कपाशीचा हिशेब साफी असतो. कपाशीचे पैसे कांट्यावर मागितले तरी मिळत असतात. ह्याशिवाय वायद्याचा व्यापार येथें फार मोठ्या प्रमाणांत चालत असतो. भडोच येथील वायदा ता. २५ एप्रील पर्यंत असतो.

## धान्याचा व्यापार.

धान्याच्या व्यापाराचें प्रमुख स्थान म्हटलें म्हणजे मांडवी, दाणाबंदर हें होय. ह्या बंदरांत खटाऱ्यांची एवढी भयंकर गर्दी उसळलेली असते कीं त्या गर्दींतून मनुष्यांस बाहेर पडण्यास मोठी मारामार पडत असते. ह्या धंद्यांत बहुतेक कच्छी लोकांचाच भरणा विशेष दिसून येतो. ह्यावरून ते ह्या धंद्यांत पूर्ण वाकबगार बनले आहेत असें दिसून येतें.

मुंबईत धान्य मोजून देण्याची वहिवाट आहे. **धान्य मोजण्याचें कोष्टकः**—२ टिपरी म्हणजे १ शेर, ४ शेर म्हणजे १ पायली, १६ पायल्या म्हणजे १ फरा, व ८ फरे म्हणजे १ खंडी.

येथें धान्य मोजून घेण्याचा किंवा तोलून घेण्याचा भाव वेगवेगळा सांगण्यांत येत असतो. मोजून घेण्यापेक्षां तोलून घेण्यांत ४।५ टक्के भाव अधिक घेण्यांत येत असतो.

---

# धान्य तोलून घेण्याचें

## खालील प्रमाणें वजन व माप समजावें.

| धान्याचें नांव | | मुंबई मण. | | खंडी. |
|---|---|---|---|---|
| गहूं ( खंडवा, पिवळा, वगैरे ) | | २७ | = | ,, |
| चणा, ज्वारी, मसूर, जव, तीळ | ... | २७ | = | ,, |
| उडीद, मूग, तूर, चवळी, मठ, वाल, वटाणे, हरभरे, | ... | २८ | = | ,, |
| मोहरी ... ... | ... | २२॥ | = | ,, |
| शेंगदाणे व एरंडी .... | ... | २० | = | ,, |

**सोनें**—सोनें हें बहुतकरून अमेरिका, आस्ट्रेलिया व दक्षिण आफ्रिका ह्या देशांतून विशेष येत असतें. सोन्याच्या जितक्या तऱ्हा आहेत तितक्या सर्व तऱ्हेचें सोनें मुंबईत विकलें जातें. नॅशनल बॅंक, चार्टर बॅंक, नेटिव्ह युनियन, मुंबई टांकसाळ पाटलासोनें, नारणमोती, चिंतु छाप, ९७ टच वगैरे सोन्याच्या अनेक तऱ्हा आहेत. नॅशनल बॅंकेची जी सोन्याची लगडी येत असते ती १०० टचची असते परंतु ती ९९ टच ६४ दोकडेच भरते.

**गिनी सोनें**—गिनी सोनें हलकें असतें. घोडा गिनीचें सोनें ९१ टच ६० दोकडे असतें. घोडा छापच्या दोन गिन्या आहेत. एक नवी व दुसरी जुनी. एडवर्ड व जार्ज महाराज यांचा छाप असलेल्या घोडा-छापचे गिनीस नवी गिनी ह्मणतात. व महाराणी छाप असलेल्या घोडा-छापचे गिनीस जुनी गिनी ह्मणतात. ज्या गिनींत जुडा व मुकूट असतो ती वजनांत २७॥ वाल ह्मणजे ११ आण्याभार असते. चिनाई गिनी ९०। टचची येत असून ती वजनांत २७॥, २५, व २२॥ वाल असते. तुर्की गिनी ९१ टच ६० दोडके असते. व ती वजनांत २५ वाल येत असते.

मुंबईंत सोन्याचें वजन रुपयांनीं करीत असतात. एक रुपयाभार ह्मणजे एक तोळा, एक तोळा ह्मणजे ४० वाल. सोन्याचा वायद्याचा व्यापार चालत असतो. त्यांत टांकसाळेच्या पाटल्याचे सोन्याची विशेष देवघेव चालत असते. '**बॉम्बे बुलियन एक्सचेंज लिमिटेड**' ह्या नांवाचें एक मंडळ आहे. ह्या मंडळानें सोन्याचे नियम ठरविलेले आहेत.

सोन्याचा सौदा २५० तोळ्याचे खालीं होत नसतो. सोन्याचा वायदा शु॥ पौर्णिमेचा असतो. तेजी मंदीची बातमी त्रयोदशीचे दिवशीं तीन वाजतां समजते. बाजार बंद असला तर चतुर्दशीचे दिवशीं तीन वाजतां समजते. हवाला शु॥ चतुर्दशीपासून सुरू होतो.

अगदीं शुद्ध सोनें असेल तर त्यास १०० नंबरी सोनें ह्मणतात. ९७ नंबरी सोन्यांत ९७ भाग सोनें शुद्ध असून बाकीचे ३ भाग हीण सोनें असतें.

**चांदी**—चांदी ही मेक्सिको व कोकेसस येथील खाणींतून गाळून इकडे येत असते. चांदीचे पाट येत असतात. एका पाटाचें वजन सुमारें २८०० ते ३२०० तोळ्यांपर्यंत भरत असतें. परंतु कित्येक पाटांचें वजन ३५०० तोळ्यांपर्यंत देखील भरत असतें. चांदीची देवघेव व वायदा १०० तोळ्यांच्या हिशेबानें होत असतो. गांवठी चांदी विलायती चांदीपेक्षां उत्तम असते. जवळ जवळ ती ९९ टचची असते. चांदी दोन प्रकारची येत असते. एक १७॥ पेनीची व दुसरी १७ पेनीची. चांदीचे जे विलायती पाट येत असतात त्यांचेवर औंसांचे आंकडे टाकलेले असतात. मुंबईच्या चांदीचा सट्टा मोठ्या प्रमाणांत होत असतो. दी बाम्बे बुलियन एक्स्चेंज कंपनीनें चांदीचे सट्ट्याविषयीं ठराविक कायदे करून ठेविले आहेत.

चांदीचा वायदा प्रत्येक मराठी महिन्याच्या व॥ ५ मीस पुरत असतो. एका पाटाचा हिशेब २००० तोळ्यांचा धरीत असतात. तेजी मंदी

शु॥ १५ च्या दिवशीं ३ वाजतां बाहेर पडत असते, परंतु रविवार असल्यास १ वाजतां; बाजार असल्यास अगर पौर्णिमेचा क्षय असल्यास प्रतिपदेस; दोन पौर्णिमास असल्यास दुसऱ्या पौर्णिमेस ह्याप्रमाणें तेजीमंदी बाहेर पडत असते. हवाला व॥ ३ पासून सुरु करून व॥ ५ मीचे दिवशीं १२ वाजेपर्यंत घटती बढतीचा भाव नक्की करून चिठ्ठी काढावी.

**मोती**—मोत्यांचा उपयोग हिंदुस्थानांत पूर्वींपासून चालू आहे. ह्या धंद्यांत बहुतकरून सुरती वाणी विशेष पडलेले असून त्यांनीं ह्या धंद्यांत बरेंच प्राविण्य मिळविलें आहे. मोत्यांची परीक्षा सर्वांत कठीण असते. मोत्याची किंमत त्याचे तेज व गोलाकार ह्यावर अवलंबून असते. मोती मोठा असून गोलाकार किंवा पाणीदार नसल्यास त्याचे किंमतींत बराच फरक पडून जातो. मोत्याच्या अनेक जाती आहेत. उत्तमोत्तम मोती बहु-तकरून पॅरीस व विलायत येथें पाठविण्यांत येत असतात.

बसऱ्याचे आसपास उत्पन्न होणाऱ्या मोतीस बसरई, अरबस्थानांतील मोखा बंदरचे मोतीस मोखाई, मोझांबिकचे लाल मोतीस निमसरी, चीन समुद्रांतील मोतीस चिनाई व सिलोनचे मोत्यास उडन असें म्हणतात. मोत्याची परीक्षा विशेषेंकरून जव्हेरी लोकांस उत्तम प्रकारें करितां येते. या बाबतींत अरब लोक बरेच हुषार असतात. ज्या मोत्यास छिद्र नसतें त्या मोत्यास कोरा मोती म्हणतात. मोत्यांचा हंगाम आषाढ व श्रावण या महिन्यांत सुरू होतो.

**सुताचा व्यापार**—सुताच्या व्यापाराचें प्रमुख स्थान ह्मटलें ह्मणजे पायधुनी नजीक **तांबा कांटा** हें होय. येथें अनेक जातीच्या सुताच्या व्यापाऱ्यांच्या बऱ्याचशा पेढ्या आहेत. सूत नं० १–२–३–४ पासून तें १३० नंबरपर्यंत गांवठी जपानी व विलायती येत असतें. प्रत्येक मिलमधून निरनिराळ्या नंबरचें सूत काढण्यांत येत असतें. हिंदुस्थानांत

सर्वांत जास्त ह्मणजे ८० नंबरपर्यंत सूत निघत असतें. तसेंच हाती व कातलेलें सर्वांत उत्तम सूत १२ नंबरपर्यंत निघत असतें. विलायती सूत १०० ते १५० काउंटपर्यंत येत असतें. हिंदुस्थानांतील सूत चीन, इराण, रंगून वगैरे ठिकाणीं जात असतें. सूत बहुतकरून मिलचे नांवावरून किंवा त्यावरील लेबलवरून विकलें जातें. उदा० सनमील, शिकारी घोडा इत्यादि.

सुताचा भाव रत्तलवरून ठरवीत असतात. गांवठी सुताची गांठ ३०० किंवा ४०० रत्तल वजनाची येत असते. जसजसें भारी नंबरचें सूत तसतसें त्याचें रत्तल कमी समजावें.

## मुंबईतील वजनांची साधारण माहिती.

हल्लीं मुंबईशीं बहुतेक बाहेरगांवचे व्यापारांचा व्यवहार असतो. मुंबईंत वेगवेगळया वजनानें माल देण्याचा प्रघात पडला आहे सबब ह्याविषयीं व्यापाऱ्यांना ही माहिती असणें अत्यंत जरुरीचें आहे. ह्यासाठीं कोणकोणत्या वजनानें कोणकोणता माल देण्यांत येतो त्याची साधारण माहिती खालीं दिली आहे, ती व्यापाऱ्यांनीं अवश्य वाचून पहावी.

**मुंबईचा मणः**—मुंबईचा वजनी शेर २८ रुपये भार आहे. अशा ४० शेरांचा एक मुंबई मण होत असतो.

**मुंबई मणावर भाव असणारे जिन्नसः**--तूप, खोबरेल, गोडें तेल, एरंडेल, करंजेल, किंकणेल गांवठी—पत्रीची—काल्पी खडीसाखर, अक्रोड, गुलाल, राळ, सरस, सुतळी कच्ची, वगैरे.

**मुंबई बेताळाः**—( मुंबई ४२ शेरांच्या मणावर भाव असणारे जिन्नस ) मध, कुंकू, मेण मलबारी, चंदन, काजू, मिरें ( पांढरें ) सुपारी ( श्रीवर्धनी ).

**मुंबई ६ मणावरः**—बंगाली कानपूरी, व बनारशी साखर, सुरा साखर ( सोरमीठ ), बंगाली व रंगुनी तांदूळ.

मुंबई ११ मणांची ( खंडी )–धणे.

मुंबई १४ मणांची ( खंडी )–ओंवा.

मुंबई १५ मणांची ( खंडी )–शोपा.

मुंबई २० मणांची ( खंडी )–आरारोट, तवकीर, पळसाचीं फुलें, शेंगदाणे, तीळ, जवस, एरंडी, गांवठी काथ्या, मुडच्यांतील खोबरें.

मुंबई २२॥ मणांची ( खंडी )–गोणींतील खोबरें व मोहरी.

मुंबई २५ मणांची ( खंडी )–हिरडा, ब्याहडा.

मुंबई २८ मणांची ( खंडी )–आमसूल, कवड्या, कात चिनई, खारीक पोत्यांतील, तुरटी पतंग मलबारी, पेंड, मोहाचें फूल, रक्तचंदन, सज्जीखार, सेंदेलोण, सुंठ ( बंगाली ), सैंधव.

मुंबई ३० मणांची ( खंडी )–खजूर.

मुंबई २१ मणांची ( खंडी )–आंबेहळद, अंबाडीवाख, गुग्गुळ, चंदन, पापडखार, मिर्ची, मिरीं, सुपारी, वावडिंग, कांदे, बटाटे, लसूण, गूळ वगैरे.

**सुर्तीमण**—३७ रुपये भार १ सुर्तीशेर. व अशा ४० शेरांचा १ सुर्ती मण समजावा.

**सुर्ती मणावर भाव असणारे जिन्नसः**—कथील, पारा, टांकणखार, मंजिष्ठ शिलारस, आवळ्या गंधक, पक्की सुतळी, ऊद वगैरे.

**सुर्ती बेताळा** ( ४२ शेरांचा सुर्ती मण ):—कृष्णागर, खिसमीस, बदाम, मनुका, लवंग, वेलदोडे, पिस्ते, बेदाणे, बडीशेप, व जिरें, अबीर, सुरवारी हिरडा.

**सुर्ती सव्वात्रेताळा** ( ४३। शेरांचा सुर्ती मण ) खडीसाखर चुनचुनी.

**सुर्ती चुमाळा ( ४४ शेरांचा सुर्ती मण ):**—कागदी बदाम, सफेद मिश्री, शालम मिश्री, कचुरा, कंकोळ, हिंग, नवसागर, पिंपळमूळ,

पिंपळी, शहाजिरें, जिरें ( रतलामी, मस्कती ) सुके अंजीर, कोकम तेल वगैरे.

सुर्ती २० मणांची ( खंडी ):— लोखंड, ( शिकेशाई ) रुपेशाई सळया ( गोल, चौरस ) पट्या.

सुर्ती मणास पक्का मण म्हणतात व मुंबई मणास कच्चा मण म्हणतात. मुंबई मण सुर्ती मणाच्या सुमारें पाऊणपट असतो. मुंबई मणाचें वजन ११२० सुर्ती रुपये भाराचें आहे. तेव्हां ही रक्कम ज्याची पाऊणपट आहे तितके भार सुर्ती मणाचे होतील.

हंड्रवेट ( मुंबई ४ मण ):—कॅरोगेटेड पत्रे, कांसें, जस्त, तांबें, पितळ, पोलाद, लोखंड, लोखंडी पत्रे, शिसें, शेंदूर, खडू, खसखस, साखर (मोरस) सुंठ ( धुवट ) कागद रद्दी, डिंक, सफेता वगैरे.

## धान्यादि पदार्थ मोजण्याचें मुंबई चालीचें कोष्टक.

| | | | |
|---|---|---|---|
| २ टिपऱ्या | = १ शेर. | ८ मण, फरे | = १ खंडी. |
| ४ शेर | = १ पायली. | २५ मण | = १ मुडा ( भाताचा) |
| १६ पायल्या | = १ मण, फरा. | २९ मण | = १ कोंकणी खंडी. |

### मुंबईतील वजनाचें कोष्टक.

| | | | |
|---|---|---|---|
| २८ तोळे (रुपये) | = मुंबईचा १ शेर | ४ मुंबई मण | = १ हंड्रवेट |
| ४० शेर | = ,, १ मण | २० हंड्रवेट | = १ टन |
| २० मण | = मुंबईची १ खंडी. | | |

---

| | | | |
|---|---|---|---|
| ४० तोळे (रुपये) | = १ रत्तल | ८० तोळे (रुपये) | = १ बंगाली शेर |
| २८ रत्तल किंवा १४ बंगाली शेर | = १ मुंबईचा मण. | ४० बंगाली शेर | = १ ,, मण |
| | | ३७ तोळे (रुपये) | = सुर्ती १ शेर |
| | | ४० सुर्ती शेर | = १ मण |

**सुचना**—मुंबई मणाचा हिशेब रत्तली वजनाचा असल्यामुळें, तो सुमारें १०९२ तोळ्यांचा मण भरतो. ह्यामुळें मणभर जिन्नस तोलतांना मुंबई १ शेर वजन कमी येतें.

## सोनें, रुपें तोलण्याचें कोष्टक.

| | | |
|---|---|---|
| ८ गुंजा | = | १ मासा |
| १२ मासे | = | १ तोळा |
| २४ तोळे | = | १ शेर |
| ३ रती | = | १ वाल |

| | | |
|---|---|---|
| $3\frac{1}{3}$ वाल | = | १ मासा |
| ४० वाल किंवा १२ मासे | = | १ तोळा (रुपया) |

## मोती तोलण्याचें कोष्टक.

| | | |
|---|---|---|
| ४ तंदूल | = | ००।. रती |
| ४ पावरती | = | १ रती |
| ३ तंदूल | = | १ आणा |
| १६ आणे | = | १ रती |
| २४ रती | = | १ टांक |
| १ टांक | = | ७० त्रायग्रेन. |

## मोत्याचा हिशेब करण्याचें कोष्टक.

| | | |
|---|---|---|
| १६ विश्वे | = | १ बदाम |
| १६ बदाम | = | १ दोकडा |
| १०० दोकडे | = | १ चवटका. |

## कागद मोजण्याचें कोष्टक.

| | | |
|---|---|---|
| २४ कागद | = | १ दस्ता |
| १० दस्ते | = | १ गड्डी |
| २० दस्ते किंवा २ गड्ड्या | = | १ रीम |
| १० रिमें | = | १ गट्ठा |

## संख्येचीं कोष्टकें.

| | | |
|---|---|---|
| १२ नग | = | १ डझन |
| १२ डझन | = | १ ग्रोस |
| २० नग | = | १ कोडी |
| १०० नग किंवा २० पंचकड्या | = | १ शेंकडा. |

## मुंबईच्या नाण्याचें कोष्टक.

| | | |
|---|---|---|
| १॥ पै | = | १ अधेला |
| २ अधेले | = | १ पैसा |
| २ पै ( अर्ध्या ) | = | १ दुगाणी |
| ३ पै | = | १ पैसा, दिडकी |
| ४ पै | = | १ फद्या |
| ५ पै | = | १। फद्या |

| | | |
|---|---|---|
| ६ पै | = | १ ढबू |
| ४ दिडक्या | = | १ आणा |
| २ आणे | = | १ चवली |
| २ चवल्या | = | १ पावली |
| २ पावल्या | = | १ अधेली |
| २ अधेल्या | = | १ रुपया. |

पै, अधेला, पैसा, ढबू हीं तांब्याचीं नाणीं आहेत. आणा, दोन आणे, चार आणे हीं निकल धातुचीं नाणीं होत. तसेंच चवली, पावली अधेली व रुपया हीं

रुप्याचीं नाणीं व गिनी हें सोन्याचें नाणें आहे. शिवाय १ रु., ५ रु., १० रु., ५० रु., १०० रु., ५०० रु., १००० रु., १०,००० रु., किंमतीच्या कागदाच्या सरकारी नोटी रुपयांच्या ऐवजीं चालवित असतात.

---

# कोणता माल कोठें मिळतो

## ह्याविषयीं ठोकळ माहिती.

**अबदुल रहिमान स्ट्रीट**—हा रस्ता पायधुनीपासून निघून क्राफर्ड मार्केटपर्यंत गेला आहे. ह्या स्ट्रीटमध्यें सर्व प्रकारचा स्टेशनरी माल, कटलरी टाईझ; मिल, जीन, प्रेस यांना लागणारा सर्वतोपयोगी सामान, प्रायमसे वगैरे सर्व प्रकारचे स्टो, कुंपणास उपयोगी अशीं कांटेरी अगर साधीं बंडलें; चीन, जपान व मद्रास येथील सर्व प्रकारच्या चटया, काथ्याचे पायपोस वगैरे सर्व तऱ्हेचा माल, मेणकापड; अत्तरें, छड्या, चष्मे, ट्रंका, तिजोऱ्या, पेटंट कुलुपें, फँसी कपाटें, सर्व प्रकारचे लहानमोठे बिलोरी आरसे, कांच व फ्रेमी; टाईमपीस, ऑफीस क्लॉक, रिष्टवॉच वगैरे सर्व प्रकारचीं घड्याळें, बिडाच्या ओतींव जाळ्या, कठडे वगैरे सामान; सोनें, चांदी गाळण्याच्या मुसा, ग्यासबत्त्या, चांदीसोन्याचे तयार दागिने, देशी विलायती औषधें वगैरे सामान मिळत असतो.

**शेखमेमन स्ट्रीट (मोतीबाजार)** हा बाजार भुलेश्वर बंबखान्यानजीक कालबादेवी रोडपासून निघून जुम्मा मशिदवरून क्राफर्ड मार्केटपर्यंत गेला आहे. ह्या बाजारांत मुख्यतः चांदी सोन्याचे वगैरे सर्व प्रकारचे लहान मोठे तयार दागिने, चांदी, सोनें, मोती, पोवळें, खऱ्या जरीच्या टोप्या व भरलेले पाट, इतर सर्व प्रकारच्या टोप्या, मखमल, रेशमी चिनाई, जपानी, कापड, जर्मनसिल्व्हरचीं व चांदीचीं भांडीं, देशी व विलायती औषधें, सुगंधी परफ्युमरी सामान; रंग, तेल, वारनिश, ब्रश

वगैरे सामान, वेलबुट्टीचे नानातऱ्हेचे पेपर, काश्मीरी शाली वगैरे अनेक प्रकारचा माल मिळत असतो.

ह्याच बाजारांत जुम्मामाशिदीजवळ मंगळदास मार्केट, चंपागल्लीचे नाक्यावर मुळजी जेठा मार्केट, व मुंबादेवी नजीक लखमीदास खिमजी मार्केट अशीं एकंदर तीन मार्किटें आहेत. हीं सर्व कापडांचीं मार्किटें असून परगांवचे व्यापारी लोक येथूनच सर्व प्रकारचें कापड खरेदी करीत असतात. ह्या तिन्ही मार्किटांपैकीं लखमीदास खिमजी मार्केट हें अगदींच लहानसें मार्केट आहे. ह्या तिन्ही मार्किटांत सुमारें एक हजाराचे वर कापडांचीं दुकानें आहेत.

**नागदेवी स्ट्रीट**—ही स्ट्रीट मांडवी पोष्ट ऑफिसचे टोंकापासून निघून क्राफर्ड मार्केट पर्यंत गेली आहे. ह्या स्ट्रीटमध्यें विशेषतः हार्डवेर मर्चंटस्, शिप चँडलर्स; जिन, मिल, प्रेस स्टोअर सप्लायर्स, मेट्ल वर्क्स ( बादल्या वगैरे सामान ), पाईप फिटिंग्ज्, सॅनिटरी प्लंबर्स, कॉटन रोप मर्चंटस् ( सुताचे सर्व प्रकारचे दोर ) सॅफ्टी मॅचेस ( आगपेट्या ), रंग, तेल, वारनीस, ब्रश वगैरे माल विकण्याचीं दुकानें आहेत.

---

# मोतीबाजार व अबदुल रहिमान स्ट्रीट

## ह्यांमधील क्रॉस रस्ते.

**पिंजारी स्ट्रीट**— ही गल्ली क्राफर्ड मार्केट नजीक आहे. ह्या गल्लीमध्यें गाद्या, रजया, उशा व दुलया मिळत असतात.

**जंजीकर स्ट्रीट ( कटलरी बझार )**—ही गल्ली जुम्मा मशिदीवरून येऊन अबदुल रहिमान स्ट्रीटला मिळाली आहे. ह्या गल्लींत सर्व प्रकारचा चहा, कॉफी, स्टेशनरी सामान, परफ्युमरी, छत्र्या वगैरे माल मिळत असतो.

**सुतार चाळ**—ह्या गल्लींत सर्व प्रकारचे पेपर ( कागदांचे रीम ) कटलरी व मन्यारी सामान, चांदी सोन्याचे तयार दागिने, खोटा कलाबतु, खोटा जरीमाल, सर्व प्रकारचे सोनेरी रुपेरी वर्ख, सर्व जातीचीं शिवण्याचीं सुताचीं बंडलें, रील वगैरे सामान मिळून शिवाय रंग, तेल, वॉरनीश, ब्रश इत्यादि माल मिळत असतो.

**शामशेट स्ट्रीट**— ही गल्ली मुळजी जेठा मार्केट समोर आहे. हींत सर्व प्रकारचे फॅन्सी चिनाई, जपानी रेशमी कापड, खरा जरी माल, फॅन्सी-रेशमी लेसीस, फिता, किनारी वगैरे मिळत असून शिवाय फॅन्सी तऱ्हेतऱ्हेच्या बनविलेल्या चंच्या व देशी, विलायती औषधें मिळतात.

**मिरझा स्ट्रीट**—ह्या गल्लींत सर्व प्रकारचे पेपर व स्ट्रॉबोर्ड मर्चन्टस्, खोटे मोतीं व अत्तरें वगैरे सामान विकण्याचीं दुकानें आहेत.

## अबदुल रहिमान स्ट्रीट व नागदेवी स्ट्रीट

### ह्यांमधील क्रॉस रस्ते.

**जंजीकर स्ट्रीट ( कटलरी बाजार )**—ही गल्ली जुम्मा मशिदवरून येऊन नागदेवी स्ट्रीट ओलांडून चकला स्ट्रीटला मिळाली आहे. ह्या गल्लींत कटलरी टाइझ ( सर्व प्रकारचा विदेशी फँसी खेळ ) स्टेशनरी सामान, परफ्युमरी ( सुगंधी तेलें अत्तरें वगैरे ) पितळी चाळण्या, लहान मोठे देशी व विलायती कांटे, वजनें, बादल्या, वेताच्या सर्व प्रकारच्या छड्या; हंड्या, झुंबरें, लँप, गोटे, कपबशा वगैरे कांचेचा सर्व प्रकारचा माल मिळत असतो.

**भाजीपाला लेन**—ह्या गल्लींत चाळणीस लागणाऱ्या सर्व प्रकारच्या पितळी व इतर धातूच्या जाळ्या, सर्व प्रकारचे साबू, स्टेशनरी सामान, लोंकर, सुगंधी तेलें व अत्तरें, पेपरमिंट क्रिस्टलस, इमारतीस उपयोगी असा देशी व विलायती फॅन्सी पितळी व लोखंडी सामान, बोल्ट, नट, रंग, वारनीस, वेताच्या सर्व प्रकारच्या छड्या, सुताचे व उलनचे बनविलेले मोजे व गंजीफ्राक वगैरे माल मिळत असतो.

**नागदेवी क्रासलेन**—ह्या गल्लींत मिल, जिन, प्रेस स्टोअर सप्लायर्स, लोंकर व सर्व प्रकारच्या शिवण्याच्या सुताचीं दुकानें आहेत.

**मशिद बंदर रस्ता**—हा रस्ता मुंबादेवीकडून येऊन अबदुल रहिमान स्ट्रीट ओलांडून जकेरिया माशिदवरून मशिद बंदरला गेला आहे. ह्या गल्लींत सर्व प्रकारचे देशी व विलायती कॅनव्हास, मेण कापड, लेदर क्लॉथ, तालपत्रीं, तरटें, सागवानी खणाच्या फॅन्सी पेट्या, मुलींचा लांकडी फॅन्सी खेळ, जयपुरी लाकडी रंगीत चित्रें, लांकडी फॅन्सी फळ-फळावळ, खडावा, लांकडी इतर सर्वतोपरी फॅन्सी सामान; चिनाई जपानी रेशमी कापड, फॅंसी वायल, आलपाक, काश्मीर, साटीन, मसराई वगैरे कापडांचे रत्तलवर विकले जाणारे कटपीस तुकडे वगैरे माल मिळत असतो.

**बारभाई मोहल्ला**—हा मोहल्ला मांडवी पोस्ट नजीक असून ह्या मोहल्ल्यांत सर्व प्रकारचे फॅन्सी छप्पर पलंग व इतर फर्निचर सामान मिळत असतो.

**प्रिन्सेस स्ट्रीट**—ही स्ट्रीट जुम्मा मशिदपासून निघून कालबादेवी रोडवरून गिरगांव रोडला मिळाली आहे. ह्या स्ट्रीटमध्यें मुख्यतः देशी व विलायती सर्व प्रकारचीं औषधें, सुगंधी तेलें व अत्तरें, केशर, कस्तुरी, अंबर, बरास, रंग, तेल, वारनीस, ब्रश, फ्रेंच पॉलीस, आर्टिस्ट कलर, अंगावर ओढण्याचीं कांबळें, किटसन लाईटच्या बत्त्या व फोटोग्राफीस उपयुक्त असा सर्व प्रकारचा सामान मिळत असतो.

**लोहार चाळ**—हा रस्ता क्राफर्ड मार्केट नजीक असलेल्या शेख मेमन स्ट्रीट पासून निघून कालबादेवी रोडला मिळाला आहे. ह्या लोहार चाळींत मुख्यतः इमारतीस उपयुक्त असा सर्व प्रकारचा पितळी अगर लोखंडी फॅन्सी सामान, सोनार, सुतार, लोहार व कारागीर या लोकांना उपयुक्त अशीं सर्व हत्यारें, तांबें, पितळ, स्टील व लोखंड या धातूंचे तार, तऱ्हेतऱ्हेचे रंगीत मोती, मणी, मन्यारी सामान व इलेक्ट्रिकल सामान मिळत असतो.

**कर्नाक रोड**—हा रोड कॅरनॉक बंदरपासून निघून क्राफर्ड मार्केटवरून धोबी तलावास मिळाला आहे. ह्या रोडवर कॅरनॉक बंदरवर पुलानजीक कॅरोगेटेड पत्रें, पोलादी बीम, इंगलायनी वगैरे इमारतीस व सर्व प्रकारच्या बैल गाड्यांना उपयुक्त असा सर्व लोखंडी सामान मिळत असतो. गालीचे, पितळी सर्व प्रकारची फॅन्सी जयपुरी चित्रें, लांकडी फर्निचर सामान, बुटस्, शुझ, स्लीपर वगैरे पादत्राण, फुटबॉल, डम्बल्स, लेदरबॉक्स, कटलरी टाईझ व फोटोग्राफीस उपयोगी असा सर्व सामान मिळत असतो.

**कालबादेवी रोड**—हा रोड पायधुनीपासून निघून धोबीतलावापर्यंत गेला आहे. ह्या रोडवर मुख्यत: हार्मोनियम पेट्या, फोनोग्राफ मशिनी व गाण्याच्या प्लेटी, सायकली, व त्यांना लागणारा उपयुक्त असा छुटक सामान, चष्मे, रविवर्मा चित्रें, चिनाई, ख्रिस्ती, इटालियन व हंगेरियन वगैरे सर्व जातीच्या टोप्या, देशी विलायती औषधें, इंग्रजी, मराठी, गुजराथी व हिंदी पुस्तकें, मिलिटरी म्युझिकल बँड इन्स्ट्रयुमेन्टस सिनेमा मशिनरी व फिल्म्स, स्टेशनरी व सर्व प्रकारचा ड्राइंगचा सामान, मुंबईच्या खऱ्या जरीच्या टोप्या, तांबें, पितळ, जर्मन सिल्व्हर व अल्युमियन या धातूंचीं सर्व प्रकारचीं भांडीं, घड्याळें, किटसन लाईटबत्त्या वगैरे सामान मिळून शिवाय पायधुणीनजीक सर्व प्रकारच्या धातूंवर सोनेरी रुपेरी गिलीट चढविण्याचीं कांहीं दुकानें आहे.

**भेंडीबाजार**—हा बाजार पायधुणीपासून लागून जे. जे. हास्पिटलपर्यंत गेला आहे. ह्या बाजारांत मुख्यतः खऱ्या जरींची बरीचशीं दुकानें आहेत. ह्या जरीवाल्यांच्या दुकानीं सर्व प्रकारचा खरा जरीमाल मिळत असतो. शिवाय कांहीं कापडाचीं दुकानें असून घोडागाडीस उपयोगी अशा सामानांचीं कांहीं दुकानें आहेत.

**बापू खोटे स्ट्रीट ( जांभळी मोहल्ला )**—हा रस्ता पायधुणीपासून निघून नळबाजारापर्यंत गेला आहे ह्या स्ट्रीट मध्यें शिवण्याच्या सर्व प्रका-

ऱ्या सुताचीं बंडलें, सुताचीं रंगीत बंडलें, सर्व प्रकारचे रील, रेशम, कपडे वगैरे रंगविण्याचे रंग, पोर्टलंड सिमेंट, चिनाई, जपानी, फ्रेंच रेशमी कापड, रंग, बेलतेल, वारनीस वगैरे माल मिळत असतो.

**किकास्ट्रीट ( गुलालवाडी )**—हा रस्ता मारवाडी बाजाराचे टोंकापासून निघून नळबाजारापर्यंत गेला आहे. ह्या गुलालवाडींत विशेषतः तिजोऱ्या, तांब्या पितळेचीं भांडीं व पितळी तोटया विकण्याचीं बरींचशीं दुकानें आहेत.

**भुलेश्वर स्ट्रीट**—हा रस्ता भुलेश्वर बंबखान्यापासून निघून ठाकुरद्वार रोडचे नाक्याजवळ सी. पी. टँकला मिळाला आहे. ह्या स्ट्रीटवर देवादिकांस उपयुक्त असा सर्व सामान, नाटकी ड्रेस व इतर सामान लोंकर, मखमल, फॅन्सी सुती व रेशमी किनारी, लेसीस, फिता; पितळी देवादिकांच्या मूर्ति तांब्यापितळेचीं हरएक प्रकारचीं पुजेचीं भांडीं, लहान मुलींचे पितळी खेळ, अडकित्ते, नाशीक, सांगली, पुणें, बनारस, मुरादाबाद व दिल्ली, वगैरे ठिकाणीं तयार होणारा पितळी फॅन्सी सामान, ट्रंका व देवादिकांच्या संगमरवरी दगडांच्या मूर्ति, खल व पारीस वगैरे जिन्नस मिळत असतात.

**सी. पी. टँकरोड ( माधवबाग )**—हा रोड ठाकुरद्वार व भुलेश्वर स्ट्रीट ह्यांचे नाक्यापासून निघून कावसजी पाटील यांच्या तलावावरून नळबाजारापर्यंत गेला आहे. ह्या रोडवर रबरी स्टॉंप, पॅड व लाकडी फॅन्सी कॅलेंडरें, इंग्रजी, मराठी, व गुजराथी शालोपयोगी व इतर पुस्तकें, पुणेरी पगड्या, सर्व प्रकारचीं पातळें, लुगडीं, खणावळी, झबलें, गंधर्व वगैरे सर्व प्रकारच्या टोप्या, रंग, बेलतेल, वारनीस व ब्रश वगैरे माल मिळत असतो.

**चकला स्ट्रीट**—हा रस्ता जकेरिया मशीदपासून निघून क्राफर्ड मार्केट नजीक कर्नाक रोडला मिळाला आहे. ह्या स्ट्रीटमध्यें मोजे, गंजीफ्राक, हातरुमाल वगैरे सर्व प्रकारचा होझिअरी माल, गालिचे, अंगावर

ओढण्याचे रग व ब्लांकिटें, गरम कापड, बुकबाइंडिंग क्लॉथ, मेणकापड, कॅनव्हीस, तालपत्री, हंड्या, झुंबरें, लॅंप, कपबशा वगैरे सर्व प्रकारचा कांचेचा व चिनी मातीचा फॅन्सी सामान, सर्व प्रकारच्या लहान मोठ्या बाटल्या, बूच, केपसूल, बरण्या, धान्य गाळण्याच्या चाळण्या, पितळी व लोखंडी पलंग, पाळणे, लहान मुलांच्या गाड्या, सायकली, फॅन्सी निरनिराळ्या फॅशनच्या लोखंडी खुर्च्या; कपाटें, टेबलें, कोच, बांक वगैरे लांकडी सर्व तऱ्हेचें फर्निचर सामान मिळत असतें.

**डोंगरी स्ट्रीट ( काथाबझार, खारीकबझार )**—हा रस्ता कॅरनॉक ब्रिजपासून निघून मशिद् बंदर रस्त्यावरून डोंगरीकडे गेला आहे. ह्या स्ट्रीटमध्यें काथ्या, काथ्याच दोर, नेतर, सप, कोलतार, डामर, सिमेट, नारळें, खोबरें, खोबरेल तेल, खारका, गहूं, व तांदूळ वगैरे सर्व प्रकारचें धान्य मिळत असतें.

**काझी सय्यद स्ट्रीट ( खांड बाजार )**—ह्या खांड बाजारांत बारदान, मिरची, हळद, गुळ, तूप, शेंगदाणे, खसखस, गलाल, साखर, सखराणा वगैरे सर्व प्रकारचा किराणा माल मिळत असतो.

**सॅम्युयल स्ट्रीट ( वडगादी )**—कानपुरी साखर वगैरे सर्व प्रकारचा किराणा माल, अंबर, कस्तुरी, बरास, लाख, शिलारस, हिंग, केशर, अबीर, कापूर, गंधक, सुराखार, शिवण्याची सुती, पेपरमिंट, सर्व प्रकारचे चहा, व सुत, ऊन, रेशम, शाई, साबू, सुगंधी तेलें वगैरे पदार्थ रंगविण्याचे सर्वप्रकारचे जर्मनी रंग मिळत असतात.

**मांजगांव ट्राम टर्मिनस**—मांजगांव ट्राम टर्मिनस जवळ मंगलोरी कौलें विकण्याचीं बरींचशीं दुकानें आहेत.

**न्यू क्विन्स रोड**—हा रोड सँडहर्स्ट ब्रिज नजीक असून, ह्या रोडवर मोटारी व गालिचे विकण्याचीं दुकानें आहेत.

# मुंबईतील निरनिराळे धंदेवाले कांहीं व्यापारी.

## कमिशन एजंट.

१ गोपाळ सखाराम अँड कंपनी, कालबादेवी रोड, मुंबई.

२ दि खानदेश श्रीकृष्ण ट्रेडिंग कंपनी, जुनी हनुमान गल्ली, मुंबई.

## ऑईल एंजिन्स वगैरे मशिनरी कमिशन एजंटस.

१ दि बेरार इंजिनिअरिंग कंपनी, कृष्ण बिल्डिंग, हार्नबी रोड, मुंबई.

२ दि न्यू खानदेश युनायटेड कमर्शिअल कंपनी, कर्नाक रोड, मुंबई.

३ एरच दि इंजिनिआरिंग कंपनी, अॅपोलो स्ट्रीट, फोर्ट, मुंबई.

## फ्रुट कमिशन एजंट.

१ ढोबळे आणि कंपनी, क्राफर्ड मार्केट, मुंबई.

## शेंगदाणा, सरकी, मिरची वगैरे मालाचे कमिशन एजन्टस्.

१ श्रीनिवास व्यंकटेश इनामदार, वडगादी, मुंबई.

२ माधवराव भिंवा पेंडणेकर, वडगादी, मुंबई.

३ कासीराम उमेदचंद, डोंगरी स्ट्रीट, मुडी बाजार, मुंबई.

## अॅल्युमिनम भांड्यांचे व्यापारी.

१ अनंत शिवाजी देसाई, मोतीबाजार, मुंबई.

२ चिमनलाल छगनलाल, कंसारा चाळ, कालबादेवी रोड, मुंबई.

३ दि डन् अॅल्युमिनम फॅक्टरी, कंसारा चाळ, कालबादेवी, मुंबई.

## तांब्या पितळेच्या भांड्यांचे व्यापारी.

१ बाबाजी अनाजी तारकर, कंसारा चाळ, कालबादेवी, मुंबई.

२ नेनसी हिराचंद दु॥ नं. ५०२ कंसारा चाळ, कालबादेवी, मुंबई.

## जर्मन सिल्व्हरच्या भांड्यांचे व्यापारी.

१ वाडीलाल दलसुखभाई अँड सन्स, मारवाडी बाजार, मुंबई.
२ हाथीभाई तुलसीदास अँड सन्स, मारवाडी बाजार, मुंबई.

## सोन्या चांदीचे दागिने विकणारे.

१ जगमोहनदास रघुनाथदास अँड कंपनी, मोतीबाजार, मुंबई.
२ कांतीलाल परतापसी, मोतीबाजार, मुंबई.
३ मेहता मगनलाल छगनलाल जव्हेरी, सुतारचाळ, मुंबई.

## तिजोऱ्यांचे व्यापारी.

१ लाला कन्हयालाल अँड सन्स, अबदुल रहिमान स्ट्रीट, मुंबई.
२ विरजी शामजी, किका स्ट्रीट ( गुलालवाडी ) मुंबई.
३ हरिचंद मंछाराम, किका स्ट्रीट ( गुलालवाडी ) मुंबई.

## मिल, जिन, प्रेस स्टोअर्स अँड सप्लायर्स.

१ आरदेसर डी वाडिया अँड कंपनी, अॅपोलो स्ट्रीट, मुंबई.
२ मोतीलाल कल्याणदास अँड कंपनी, अबदुल रहिमान स्ट्रीट, मुंबई.
३ हिपतुल्ला सालेभाई अँड कंपनी, अबदुल रहिमान स्ट्रीट, मुंबई.

## चष्म्यांचे व्यापारी.

१ दस्तूर पी. एम. कंपनी, हार्नबी रोड, मुंबई.
२ फिलिप्स अँड कंपनी, हार्नबी रोड, मुंबई.
३ बारटन अँड कंपनी, कालबादेवी रोड, मुंबई.

## रंग, बेलतेल, वारनिस इत्यादिकांचे व्यापारी.

१ कापडिया ब्रदर्स, अबदुल रहिमान स्ट्रीट, मुंबई..
२ हुसेनअल्ली फिदा हुसेन रंगवाला, सुतारचाळ, मुंबई.
३ करीमभाई नबुभाई रंगवाला, मोती बाजार, मुंबई.

## कागदांचे व्यापारी.

१ अल्लीभाई अकबरअल्ली, सुतार चाळ, मुंबई.
२ इब्राइमजी मुल्ला महमद अल्ली, सुतारचाळ, मुंबई.
३ महासुख तैयबअल्ली अँड कंपनी, सुतारचाळ, मुंबई.

## ग्रामोफोन व हार्मोनियम डिलर्स.

१ दादाफोन टॉकिंग मशीन अँड कंपनी, कालबादेवी, मुंबई.
२ मॅजेस्टिक म्युझिकल हॉल, कालबादेवी, मुंबई.
३ जेम्स मॅन्युफॅक्चरिंग कंपनी, कालबादेवी रोड, मुंबई.

## ग्लासवेर लँपकेर यांचे व्यापारी.

१ सालेमहमद पदमसी अँड कंपनी, चकला स्ट्रीट, मुंबई.
२ ए. हसनअल्ली अँड कंपनी, भंडारी स्ट्रीट, मांडवी नं. ३ मुंबई.

## लांकडी फर्निचर डिलर्स.

१ बॉम्बे फार्निचर डेपो, कर्नाक रोड, मुंबई.
२ पी. मेहर अल्ली अँड कंपनी कर्नाक रोड, मुंबई.

## रबरी स्टँप बनविणारे.

१ मानकामे अँड ब्रदर्स, कालबादेवी रोड, मुंबई.
२ पी. पी. रेले अँड सन्स, कालबादेवी रोड, मुंबई.
३ मराठा पेंटिंग वर्क्स, सी. पी. टँक रोड, मुंबई.

## सायकल डिलर्स.

१ ठाणावाला अँड पटेल, कालबादेवी रोड, मुंबई.
२ ब्रिटिश सायकल कंपनी, कालबादेवी रोड, मुंबई.
३ वेलिंगटन सायकल कंपनी, हार्नबी रोड, मुंबई.

## बुकसेलर्स.

१ रामचंद्र गोविंद अँड सन्स, काळबादेवी रोड, मुंबई.
२ तुकाराम पुंडलीक शेटथे, बुकसेलर, माधवबाग, मुंबई.
३ बाळकृष्ण लक्ष्मण पाठक, मोतीबाजार, मुंबई.

## सिनेमेटोग्राफ इंपोर्टर्स.

१ बी. आरदेसर अँड कंपनी, काळबादेवी रोड, मुंबई.
२ हिंदुस्थान सिनेमा फिल्म कंपनी, अँपोलो स्ट्रीट, मुंबई.

## चहा व काफी यांचे व्यापारी.

१ लिप्टन टी डिपॉट, काळबादेवी रोड, मुंबई.
२ द्वारकादास शिरामदास, मिरची गल्ली, मांडवी नं. ३ मुंबई.

## साखरेचे व्यापारी.

१ वलीमहंमद अलारेखा अँड कंपनी, काझी सैयद स्ट्रीट, मुंबई.
२ फुलचंद प्रेमजी, काझी सय्यद स्ट्रीट, मुंबई.
३ गोपालदास दयाल, काझी सय्यद स्ट्रीट, मुंबई.

## साबूंचे व्यापारी.

१ ए. सी. भेसानिया अँड को. मिरचीगल्ली, पो० नं०३ मुंबई.
२ तैयबअल्ली महमदअल्ली अँड को. भाजीपाला स्ट्रीट, मुंबई.
३ अबदुल महमदअल्ली, भाजीपाला स्ट्रीट, मुंबई.

## केशराचे व्यापारी.

१ एस. माणके अँड को. मिरची गल्ली, पो० नं० ३ मुंबई.
२ ठक्कर करसन लधा वडगादी, सॅम्युअल स्ट्रीट, मुंबई नं० ३.

## स्टेशनरी सामानाचे व्यापारी.

१ नजरअल्ली अँड कमरुद्दीन, अबदुल रहिमान स्ट्रीट, मुंबई.
२ गुलामअल्ली अहमदअल्ली अँड कंपनी, अबदुल रहिमान स्ट्रीट, मुंबई.

## टाईझ अँड कटलरी सामानाचे व्यापारी.

१ हाशम कासम अँड ब्रदर्स, अबदुल रहिमान स्ट्रीट, मुंबई.
२ हाजी जानामहमद लतीफ, अबदुल रहिमान स्ट्रीट, मुंबई.

## आरसे व फ्रेमी यांचे व्यापारी.

१ करीमजी इब्रामजी आरसीवाला, अबदुल रहिमान स्ट्रीट, मुंबई.
२ मुल्ला मुशाजी मुल्ला आदमजी आरसीवाला, अबदुल रहिमान स्ट्रीट, मुं.

## किटसन लाईट वगैरे बत्त्यांचे व्यापारी.

१ अब्बास आणि कंपनी, अबदुल रहिमान स्ट्रीट, मुंबई.
२ महमद भाई अँड कंपनी, अबदुल रहिमान स्ट्रीट, मुंबई.

## घड्याळांचे व्यापारी.

१ वेस्ट अँड वॉच कंपनी, हार्नबी रोड, मुंबई.
२ दि बाम्बे वॉच, क्लॉक मार्ट, अबदुल रहिमान स्ट्रीट, मुंबई.
३ मोहनदास कमळशी, कंसारा चाळ, कालबादेवी रोड, मुंबई.

## कापड शिवण्याच्या मशिनींचे व्यापारी.

१ सिंगर सोईंग मशीन, हार्नबी रोड, मुंबई.
२ व्हिक्टोरिया सोईंग मशीन, हार्नबी रोड, मुंबई.

## फोटोग्राफीस लागणाऱ्या सामानाचे व्यापारी.

१ सावंत डब्ल्यू. डी. प्रिन्सेस स्ट्रीट, मुंबई.
२ नाडकर्णी अँड कंपनी, कर्नाक रोड, मुंबई.

## देवादिकांचे व इतर चित्रांच व्यापारी.

१ ए. के. जोशी, कालबादेवी रोड, मुंबई.
२ अनंत शिवाजी देसाई, मोतीबाजार, मुंबई.

## देशी व विलायती औषधांचे व्यापारी.

१ ट्रेचर अँड कंपनी, एक्स्प्लेनेड रोड, मुंबई.

२ केम्प आणि कंपनी, एल्फिन्स्टन सर्कल, मुंबई.

३ सोराबजी पेस्तमजी गांधी अँड सन्स, प्रिन्सेस स्ट्रीट, मुंबई.

## जर्मनी वगैरे रंगांचे व्यापारी.

१ करसनदास तेजपाल सॅम्युअल स्ट्रीट, वडगादी, मुंबई.

२ सुरजी वल्लभदास कलर कंपनी, सॅम्युयल स्ट्रीट, वडगादी, मुंबई.

## कॅरोगेटेड पत्रे, बीम वगैरे लोखंडी सामानाचे व्यापारी.

१ मुलजी हरीदास अँड कंपनी, कॅरनॉक बंदर, मुंबई.

२ किंग जॉर्ज सर्व्हिस ॲन्ड कंपनी, हार्नबी रोड, मुंबई.

## बुट, शुझ मेकर्स अँड डिलर्स.

१ ताजभाई आणि कंपनी, अबदुल रहिमान स्ट्रीट, क्राफर्ड मार्केट समोर, मुंबई.

२ बाम्बे हायक्लास बूट अँड शुझ कंपनी, लालसिंग बिल्डिंग, कॅरनॉक रोड, मुंबई.

## घोडा गाडीस लागणाऱ्या सामानाचे व्यापारी.

१ इ. एस. माला अँड कंपनी, भेंडी बाजार, परेल रोड, मुंबई.

२ नुरभाई जिवाजी, भेंडीबाजार, परेल रोड, मुंबई.

## गालिच्यांचे व्यापारी.

१ हिराचंद वलीराम कर्नाक रोड, मुंबई.

२ पोहूमुल ब्रदर्स, अॅपोलो स्ट्रीट, फोर्ट, मुंबई.

## खऱ्या जरीचे व्यापारी.

१ उत्तमचंद नथुसा जरीवाला, भेंडी बाजार, मुंबई.

२ पुनमचंद नगीनदास जरीवाला, भेंडी बाजार, मुंबई.

# नाटकांचीं व सिनेमांचीं थिएटरें.

## नाटकांचीं थियेटरें.

**गेएटी थिएटर,** बोरीबंदर समोर.
**एम्पायर थिएटर,** हार्नबी रोड, फोर्ट.
**प्रिन्सेस थिएटर,** कालबादेवी रोड, भांगवाडी.
**दुबाश थिएटर,** चर्नीरोड जंक्शन, कामा बागे समोर.
**बालीवाला थिएटर,** ताडदेव, फाकलंड रोड.
**बाम्बे थिएटर,** फाकलंड रोड, पिलाहाऊस.
**एल्फिन्स्टन थिएटर,** फाकलंड रोड, पिलाहाऊस.
**रिपन थिएटर,** ग्रँटरोड कार्नर, पिलाहाऊस.
**व्हिक्टोरिया थिएटर,** ग्रँटरोड, पिलाहाऊस.
**कोरोनेशन थिएटर,** ग्रँटरोट, पिलाहाऊस.

## सिनेमांचीं थिएटरें.

**मॅजेस्टिक सिनेमा,** गिरगांव ट्राम टर्मिनस जवळ.
**इंपिरियल सिनेमा,** लॅमिंगटन रोड.
**वेस्ट अँड सिनेमा,** चर्नीरोड, माधवाश्रम जवळ.
**पाथे सिनेमा,** रॉयल ऑपेरा हाऊस, सँडहर्स्ट ब्रिज जवळ.
**मादलीन सिनेमा,** ग्रँटरोड ट्राम टर्मिनस.
**ग्लोब सिनेमा,** सँडहर्स्ट रोड, गोळपिठा.
**एक्सेलसिअर सिनेमा,** रॅव्हेलिन स्ट्रीट, फोर्ट.
**प्रेशिअस सिनेमा,** लॅमिंगटन रोड.
**आलेक्झांड्रा सिनेमा,** बेलासिस रोड, पारशी स्टेच्यू नजीक.
**एम्प्रेस सिनेमा,** फोर्ट.
**न्यू वेनस सिनेमा,** भायखळा, गुड डिपॉट समोर.
**लक्ष्मी सिनेमा,** परेलरोड, करीरोड स्टेशननजीक.

# मुंबईतील प्रसिद्ध स्थळें पाहण्याचा कार्यक्रम.

## पहिला दिवस.

**प्रेक्षणीय स्थळें**—* ( १ ) मुंबादेवी. ( २ ) पारस नाथाचा डेरा. ( ३ ) स्वामीनारायण मंदिर. ( १९ ) भुलेश्वर मार्केट. ( ४ ) भुलेश्वर. ( ५ ) पंचमुखी हनुमान. ( ६ ) श्री लक्ष्मीनारायण ( ७ ) कृष्णबाग.

**सकाळचा कार्यक्रम**—सकाळीं स्नान वगैरे आटोपून प्रथम मोतीबाजारांतून मशिद बंदरकडे जाणाऱ्या रस्त्याचे बाजूस मुंबादेवीचा मुख्य दरवाजा आहे. त्या दरवाज्यानें आंत शिरून प्रथम मुंबादेवीचें दर्शन घ्यावें. नंतर ह्या देवालयांतील इतर देवतांचीं दर्शनें घेऊन ह्या देवालयाचे शेजारींच एक तलाव आहे. तो पहात पहात व तलावाचे समोर असलेल्या देवतांचीं दर्शनें घेत घेत समोरच्या दरवाज्यानें बाहेर पडावें. नतर येथून पायधुनीनजीक मारवाडी व श्रावक वाणी यांचें एक देवालय आहे तें पहावें. नंतर गुलालवाडींतून तिसरे भोईवाड्याचे गल्लींत यावें. ह्या भोईवाड्यांत स्वामीनारायणाचें प्रसिद्ध देवालय आहे तें पाहून पुनः त्याच गल्लीनें समोरचे टोंकावर यावें. ह्या टोंकाचे डावे बाजूस भुलेश्वर नामक एक मार्केट आहे तें पहावें. नंतर येथून अगदीं थोड्याशा अंतरावर भुलेश्वर नामक प्रसिद्ध देऊळ आहे. ह्या देवालयांतील शंकराचे व इतर देवतांचें दर्शन घेऊन, ह्या देवालयाचे मुख्य दरवाज्यासमोरच पंचमुखी हनुमानाचें देऊळ आहे तें पाहून घ्यावें. नंतर भुलेश्वरांतील कबुतरखान्याचे समोर अगदीं जवळच पांजरापोळचे नाक्यावर माधवबागेचा एक मोठा दर-

---

* टीप—सदर्हु पुस्तकांत चाळीस पासून शंभर पानांचे आंत ज्या ज्या प्रेक्षणीय स्थळांचें वर्णन करण्यांत आलें आहे त्या त्या स्थळांचे आरंभीं जे एक, दोन, तीन असे क्रमशः शेवटपर्यंत आंकडे घालविण्यांत आले आहेत तेच आंकडे येथें त्या त्या स्थळांचे नांवापूर्वीं दिलेले आहेत.

वाजा आहे. त्यांतून आंत शिरावें. येथून सुमारें एक फर्लांगाचे अंतरावर ह्या वाडींत श्रीलक्ष्मीनारायणाचें मंदिर आहे तें पहावें. नंतर समोरच ह्या देवालयाचा मुख्य दरवाजा आहे. ह्या दरवाज्यानें बाहेर पडून डावे बाजूनें वळावें व कांहींसें पुढें गेल्यावर कांदेवाडीचे नाक्यावर कृष्णबाग नामें एक रम्य स्थळ आहे. ह्या बागेंत मुरलीधराचें एक रमणीय देऊळ आहे. ह्या देवालयांतील मुरलीधराचें दर्शन घेऊन मुक्कामावर यावें.

## दुपारचा कार्यक्रम.

**प्रेक्षणीय स्थळें**—( ५७ ) अपोलो बंदर. ताजमहाल हॉटेल. (३९) प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियम. ( २८ ) प्रिन्स ऑफ वेल्स यांचा पुतळा. ( सातवे एडवर्ड. ) ( ४५ ) डॉकयार्ड फॅक्टरी. ( ४६ ) टाऊन हॉल. ( ३१ ) मार्किस कार्नवालीस व मार्किस वेलस्ली यांचे पुतळे. ( ४४ ) न्यू सेक्रेटरिएट ऑफिस. ( ४३ ) युनिव्हरसिटी सिनेट हॉल. ( ४२ ) राजाबाई टॉवर व युनिव्हरसिटी लायब्ररी ( ४० ) हायकोर्ट. ( २९ ) सर रिचर्ड टेंपल यांचा पुतळा. ( ३० ) नामदार गोपाळकृष्ण गोखले यांचा पुतळा ( २७ ) महाराज्ञी व्हिक्टोरिया यांचा पुतळा ( ४८ ) जनरल पोस्ट ऑफिस. ( ४९ ) बोरीबंदर स्टेशन. ( ५० ) म्युनिसिपल ऑफिस. ( १७ ) क्राफर्ड मार्केट.

भोजन वगैरे आटोपल्यावर कोटांतील प्रेक्षणीय स्थळें पहावयासाठीं कोटांत जाणाऱ्या ट्रामगाडींत बसून म्युझियम इस्ट अगर म्युझियम वेस्टचे तिकीट काढावें. इच्छित स्थळीं टामवेंतून उतरल्यानंतर पूर्व दिशेस असलेल्या अपोलो बंदरास जावें. व तेथील हिंदुस्थानचा दरवाजा, माजी व्हाइसराय साहेब यांचा पुतळा, समुद्राचा भव्य देखावा वगैरे पाहून, ह्या बंदराचे समोरच एक दगडी भव्य इमारत बांधलेली आहे. ह्या इमारतींत ‘ **ताजमहाल** ’ नामें एक हॉटेल आहे. ह्या हॉटेलमध्यें युरोपिअन.

संस्थानिक व गर्भश्रीमंत लोक उतरत असतात. ह्या हॉटेलमध्यें उतारू लोकांसाठीं एकंदर ४०० खोल्या काढलेल्या आहेत. येथें दर मनुष्यास दर दिवसास १० रुपये चार्ज पडत असतो. सतत महिनाभर राहिल्यास एका मनुष्यास २७० रुपये पडतात. तसेंच कायमचे राहणारे इसमास २४० रुपये महिना पडतो. ह्या इमारतीचें आंतील काम अत्यंत प्रेक्षणीय केलेलें आहे. हें हॉटेल पाहून होतांच म्युझियम इस्टला परत यावें. येथें प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियम आहे तें पाहून घ्यावें.नंतर ह्या म्युझियमच्या पश्चिमेस एक्स्प्लेनेड रोडवर सातवे एडवर्ड महाराज यांचा पुतळा आहे तो पाहून घ्यावा. नंतर येथून पूर्व दिशेस ॲपोलो स्ट्रीटवर डॉकयार्ड फॅक्टरी आहे. ही फॅक्टरी पाहून होतांच उत्तरेस सुमारें एक फर्लांगाचे अंतरावर टाऊन हॉल व ह्या टाऊन हॉलचे समोर मार्किस कार्नवालीस आणि मार्किस वेलस्ली यांचे पुतळे एल्फिन्स्टन सर्कल नांवाचे बागेंत उभारलेले आहेत ते पाहून घ्याव.

नंतर येथून पुनः पाश्चिमेस एक फर्लांगाचे अंतरावर हार्नबी रोडवर फ्लोरा फाउंटेन नांवाचें कारंजें आहे. ह्या कारंजावरून समोरच चर्चगेट स्टेशनाकडे एक रस्ता गेलेला आहे; ह्या रस्त्यानें कांहींसें पुढें जातांच सर रिचर्ड टेंपल व नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांचे पुतळे दृष्टीस पडतात. हे पुतळे पाहून झाल्यानंतर मेयो रोडनें उत्तरदिशेकडे वळावें. ह्या रस्त्यानें कांहींसें पुढें गेलें ह्मणजे महाराज्ञी व्हिक्टोरिया यांचा पुतळा दृष्टीस पडतो. हा पुतळा पाहून हार्नबी रोडवर यावें. व ह्या रस्त्यानें भव्य इमारती पहात पहात बोरीबंदर स्टेशनानजीक यावें. ह्या स्टेशनानजीक फोर्ट स्ट्रीटचे टोंकावर जनरल पोस्ट ऑफिस आहे; हें ऑफिस पाहून बोरी बंदरास यावें. बोरी बंदर पाहून होतांच समोरच असलेलें म्युनिसिपल ऑफिस आहे. ह्या ऑफिसांत पश्चिम दिशेस कार्पो-

रेशन हॉल आहे. ह्या हालाचें काम अगदीं पहाण्यासारखें आहे. हें ऑफिस पाहन होतांच हार्नबी रोडनें सिताराम बिल्डिंग वरून क्राफर्ड मार्केटास यावें. व हें मार्केट पाहून बिऱ्हाडीं यावें.

## दुसरा दिवस.

**प्रेक्षणीय स्थळें**—( १२ ) वालुकेश्वर.

**सकाळचा कार्यक्रम**—सूर्योदयापूर्वी उठून मुखमार्जनविधि आटोपून समुद्रस्नान व वालुकेश्वराचें दर्शन करावयासाठीं बाहेर पडावें. व ट्रामवेंत बसून सँडहर्स्ट ब्रीजचें तिकीट काढावें. सँडहर्स्ट ब्रिजजवळ ट्रामवेंतून उतरतांच येथून वालुकेश्वरास जावयासाठीं एक व्हिक्टोरिया करावी व वालुकेश्वरास जावें. वाळकेश्वरास आल्यावर एका ब्राह्मणास बरोबर घेऊन यथाविधि समुद्रस्नान, रामकुंडस्नान व बाणगंगास्नान करावें. ह्याबद्दल ब्राह्मणास यथाशक्ति दक्षिणा द्यावी. नंतर वालुकेश्वराचें दर्शन घेऊन बिऱ्हाडीं यावें.

## दुपारचा कार्यक्रम.

**प्रेक्षणीय स्थळें**—( २३ ) प्रिन्सेस डॉक. ( ३७ ) राणीचा बाग. ( ५३ ) आंधळ्यांची शाळा. ( १३ ) महालक्ष्मी. ( ५६ ) हँगींग गार्डन. ( १० ) बाबुलनाथ. ( ५५ ) चौपाटी.

भोजन वगैरे आटोपल्यावर प्रिन्सेस डॉक पहावयासाठीं ट्रामवेंत बसून प्रिन्सेस डॉकचें तिकीट काढावें. प्रिन्सेस डॉक येथें ट्रामवेंतून उतरतांच जेथें उंच मनोरा बांधलेला आहे तेथें ह्या गोदीचे आंत शिरण्याचा मुख्य दरवाजा आहे. ह्या दरवाज्यानें आंत शिरावें. व आंतील जहाजें, यारी नांवाचीं यंत्रें वगैरे पहात पहात समुद्रकांठीं यावें. येथून समुद्राचा देखावा वगैरे पाहून होतांच गोदींतून बाहेर पडावें. नंतर राणीचा बाग पहावया-

साठीं ट्रामवेंत बसून व्हिक्टोरिया गार्डनचें तिकीट काढावें. राणीचे बागे-जवळ ट्रामवेंतून उतरतांच आंत जाऊन प्रथम पदार्थसंग्रहालय पाहून घ्यावें. नंतर बागेंतील सजीव प्राणी वगैरे पाहून झाल्यावर महालक्ष्मीचें दर्शन घ्यावयासाठीं पुनः ट्रामवेंत बसून ताडदेवचें तिकीट काढावें. ताडदेवपासून सुमारें एक मैलावर महालक्ष्मीचें देवालय आहे. ह्याच रस्त्यावर अगदीं शेवटचे भागास आंधळयांची शाळा आहे ती पाहून घ्यावी. नंतर समुद्र-कांठाजवळ वार्डन रोडनें डावे हातानें वळून कांहींसें पुढें गेल्यावर उजवे हातास एका दरवाज्यावर ' तुळशीदास गोपाळजी धर्मशाळा ' अशी पाटी लावलेली दृष्टीस पडते. ह्या दरवाज्यानें आंत शिरून तलावाचे कांठाकांठानें नीट सरळ बरेंच लांब निघून गेल्यावर कांहीं पायऱ्या दृष्टीस पडतात. ह्या पायऱ्या चढून वर गेलें म्हणजे समोरच महालक्ष्मीचें देवालय दृष्टीस पडतें. महालक्ष्मीचें दर्शन घेऊन कांहीं वेळ विसांवा घ्यावा. नंतर तलावानजीक पेडर रोड आहे ह्या रोडनें अत्युत्तम असे बंगले पहात पहात गिब्स रोडवरून हँगिंग गार्डनला यावें. ह्या बागेंत कांहीं वेळ विश्रांति घेऊन, ह्या टेकडीचे खालीं बाबुलनाथाचें देवालय आहे. हें देवालय पाहून चौपाटीस यावें. चौपाटीस कांहींवेळ समुद्रावरील हवा खाऊन बिऱ्हाडीं यावें.

---

# मुंबईंतील ट्रामवे सफर.

१ प्रथम वाटेल तेथून ट्रामवेंत बसून सासून डॉक येथें जावें.

**२ सासून डॉक ते दादर ( व्हाया कालबादेवी ) १॥ आणा.** ही गाडी म्युझियमला बदलवून, येथून दादर येथें जाणाऱ्या १ नंबरच्या ट्रामवेंत बसावें व दादरला जावें.

३ दादर ते म्युझियम वेस्ट ( व्हाया गिरगांव ) १॥ आणा. येथून पुनः १ नंबरच्या ट्रामवेंत बसून म्युझियम वेस्टला यावें.

४ म्युझियम इस्ट ते टांकबंदर. १॥ आणा. येथून ट्रामवेंत बसून बेलार्ड पिअरलाही गाडी बदलवावी. नंतर येथून १९ नंबरच्या ट्रामवेंत बसून टांकबंदर येथें जावें.

५ टांकबंदर ते सँडहर्स्ट रोड. १ आणा. येथून २१ नंबरचे ट्रामवेंत बसलें म्हणजे ती सरळ सँडहर्स्ट रोडला जाते.

६ सँडहर्स्ट रोड ते सी. पी. टँक. १ आणा. ही ट्राम राउंड टेंपल येथें बदलवून, येथून १२ नंबरचे ट्रामनें सी. पी. टँक येथें जावें.

७ सी. पी. टँक ते जेकब सर्कल. १ आणा. येथून १२ नंबरची ट्राम सरळ जेकब सर्कलला जाते.

८ जेकब सर्कल ते मांजगांव. १ आणा. ही ट्राम दोन टांकीजवळ बदलवून, येथून १० नंबरचे ट्रामनें माजगांवास जावें.

९ मांजगांव ते ताडदेव. १ आणा. ही ट्राम ग्रँटरोड कार्नरजवळ बदलवून, येथून १३ नंबरचे ट्रामनें ताडदेवास जावें.

१० ताडदेव ते बेलार्ड पिअर. १ आणा. येथून १३ नंबरची ट्राम बेलार्ड पिअर येथें सरळ जाते.

११ बेलार्ड पिअर ते कॅरनॉक बंदर. १ आणा. येथून १३ किंवा १६ नंबरचे ट्रामवेनें क्राफर्ड मार्केट येथें येऊन ट्राम बदलवावी व येथून २० नंबरचे ट्रामनें कॅरनॉक बंदर येथें जावें.

१२ कॅरनॉक बंदर ते फलोरा फाउंटेन १ आणा. येथून ट्रामवेंत बसून धोबीतलावास यावें व तेथून ८ नंबरचे ट्रामनें फ्लोरा फाउंटेन येथें जावें.

१३ फ्लोरा फाउंटेनहून ट्रामवेंत बसून मुक्कामावर यावें.



## फॅन्सी लेबलें.

फोटोग्राफर्स, केमिस्ट, परफ्युमर्स, कारखानदार यांस आपले मालावर लावण्याची फॅन्सी लेबलें तयार होतात. त्याचप्रमाणें रबर स्टँप लाखेचीं पितळी सिलें, शिपायांचे पट्टे, एंग्रेव्हींग ब्लॉक, स्टिरीयो वगैरे कामें होतात. कॅटलाग मागवा. छापखानेवाले यांनीं प्रेसचें नांव कळविल्यास स्टिरीयो चित्रांचा कॅटलाग पाठवूं. त्याचप्रमाणें स्वतःचा छापखाना असल्यामुळें सर्वतऱ्हेचीं छपाईचीं कामें होतात.













पत्ता—जी. पी. दांडेकर बंधु, मालक—शंकर आर्ट प्रिं. प्रेस.
रबर स्टँप ब्लॉक आणि स्टीरियो मेकर्स, उरणकर वाडी, मुंबई नं. ४.

---

## पुणेरी पागोट्यांच्या झालरी व पट्टे.

आमच्या दुकानीं पागोट्यांच्या खऱ्या जरीच्या ' सुनेरी झालरी व पट्टे ' प्रत्येकीं सुमारें २॥ रु. पासून ६ रु. किंमती पर्यंत मिळत असतात तुम्हांस ज्या किंमतीची झालर किंवा पट्टा हवा असेल त्या किंमतीपर्यंत आर्डरीप्रमाणें बनवून व्ही. पी. करून पाठवूं. शिवाय सुनेरी, रुपेरी कलाबतु, सुनेरी रुपेरी झिक, कोरा, कांगरी, टिकी, कटोरी वगैरे सर्वप्रकारचा खऱ्यापैकीं जरीमाल मिळत असतो. एकवेळ अवश्य अनुभव घेऊन पहा. बाहेरगांवचे आर्डरीवर पूर्ण लक्ष दिलें जाईल.

पत्ता—उत्तमचंद नथुसा जरीवाला,
भेंडीबाजार, पायधुनी, मुंबई नं. ९.